साहित्यस्नेहमंडळाचें तिसरें पुस्तक

तव कथामृतं तप्तजीवनं कविभिरीडितं कल्मषापहम् ।
श्रवणमङ्गलं श्रीमदाततं भुवि गृणन्ति ते भूरिदा जनाः ॥

श्रीमद्भागवत, १०-३१-९

# सुश्लोकगोविंद

## श्रीजयदेवकविकृत गीतगोविंद काव्याचा मराठी श्लोकबद्ध अनुवाद


लेखक

**रामचंद्र चिंतामण श्रीखंडे, एम्. बी., बी. एस्.**

' वाङ्मय-श्री-खण्ड ' ग्रंथाचे संपादक


विवेचक प्रस्तावना, प्रसंगोचित मनोहर प्राचीन रंगित चित्रें व तत्संबंधीं कलेतिहासावर मार्मिक तज्ज्ञाचा ( श्रीमंत बाळासाहेब पंडित प्रतिनिधि, बी. ए., अधिपति स. औंध यांचा ) निबंध, आणि मूळ श्रीजयदेवकविकृत गीतगोविंद यांसह


प्रथमावृत्ति

शके १८५५ श्रीशिवजयन्ती सन १९३४

किंमत दीड रुपया

श्रीमंत भवानराव श्रीनिवासराव ऊर्फ बाळासाहेब पंडित
प्रतिनिधि, बी. ए., अधिपति सं. औंध



# अर्पणपत्रिका

**श्रीमंत भवानराव श्रीनिवासराव**

ऊर्फ

**बाळासाहेब पंडित प्रतिनिधि,** बी. ए.

**अधिपति सं० औंध**

यांस

त्यांच्या ठायीं उत्कटत्वानें वसत असलेल्या

अनेक महनीय सद्गुणांविषयीं मला

वाटत असलेला हार्दिक पूज्यभाव

व्यक्त करण्याकरितां

**हा ग्रंथ**

सुश्लोकगोविंदाविषयीं त्यांनीं दाखविलेली थोर आस्था

व

**दिलेलें बहुविध प्रोत्साहन**

हीं

कृतज्ञतापूर्वक स्मरून

अत्यंत आदरानें व नम्रपणें

अर्पण करीत आहें.

—रामचंद्र चिंतामण श्रीखंडे



जयतु श्रीमन्माहिमा

गुणिजनगुणगणविकाससत्कीर्तिः ।

जयति यथा रविमाहिमा

यो विश्वाब्जं विकासयति ॥१॥

—रा. चिं. श्रीखंडे

# अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



---

## तीन रंगीं चित्रें

# प्रस्तावना

पुञ्जीभूतं प्रेम गोपाङ्गनानां मूर्तीभूतं भागधेयं यदूनाम् ।
एकीभूतं गुप्तवित्तं श्रुतीनां श्यामीभूतं ब्रह्म मे सन्निधत्ताम् ॥

—शिवचैतन्य

क्वेमाः स्त्रियो वनचरीर्व्यभिचारदुष्टाः कृष्णे क्व चैष परमात्मनि रूढभावः ।
नन्वीश्वरोऽनुभजतोऽविदुषोऽपि साक्षाच्छ्रेयस्तनोत्यगदराज इवोपयुक्तः ॥ ५९

वन्दे नन्दव्रजस्त्रीणां पादरेणुमभीक्ष्णशः ।
यासां हरिकथोद्गीतं पुनाति भुवनत्रयम् ॥ ६३

—श्रीमद्भागवत १०. ४७.

श्रीजयदेवकविकृत गीतगोविंद काव्य हें संस्कृत काव्यमहोदधींतील एक उज्ज्वल रत्नच असें मानलें गेलें असून विख्यात जर्मन कवि गटे यानें तर प्रस्तुत काव्याची योग्यता शाकुंतल व मेघदूत या ग्रंथांच्या बरोबरीनें गणली आहे. जयदेवाचा जन्म इसवी सनाच्या बाराव्या शतकांत म्हणजे संस्कृत वाङ्मयेतिहासाच्या अगदीं अवनतीच्या कालांत झाला असला तरी त्या कालांत झालेले नैषधीयचरित, काव्यप्रकाश, सिद्धांतशिरोमणि इत्यादि ग्रंथ विचारांत घेतले, तर संस्कृत वाङ्मयाच्या अगदीं भरभराटीच्या कालांत उत्पन्न झालेल्या कोणत्याही ग्रंथाच्या पंक्तीस बसण्यासारखे हेहि ग्रंथ झाले आहेत असें कोणाहि विद्वानास वाटल्यावांचून रहाणार नाहीं आणि विशेषतः गीतगोविंद ही लहानशीच काव्यकृति वाङ्मयाच्या नभःप्राङ्गणांत शुक्राच्या चांदणीप्रमाणें तेजानें चमकत असून रसिकांचे मनश्चक्षु आपल्याकडे स्वगुणांनीं वेधीत आहे; व पुढेंहि ती तसेंच वेधीत राहील यांत संशय नाहीं.

कविराज जयदेवासंबंधीं अत्यंत आदराचे उद्गार मोठमोठ्या पौरस्त्य व पाश्चात्य पंडितांनींहि काढले असून रोमेश सी. दत्त, सी.

आय्. ई. हे आपल्या 'अर्वाचीन हिंदु संस्कृति' [Later Hindu Civilization 500-1200 A.D.] या ग्रंथांत लिहितातः— "संस्कृत वाङ्मयांत अत्यंत मधुर असें काव्य कोणीं कधीं लिहिलें असेल तर तें १२ व्या शतकांतील जयदेवानें रचलेलें गीतगोविंद हें होय." भारताचार्य चिंतामणराव वैद्य हे आपल्या Downfall of Hindu India (1000-1200 A D) या महनीय ग्रंथांत असें वर्णन करतात कीं, "या पडत्या कालांतसुद्धां हिंदवी बुद्धिमत्तेनें आपलें तेज व तीक्ष्णता अद्यापहि उत्कृष्ट असल्याचें जगाच्या निदर्शनास आणलें; कारण काव्यप्रकाश, सिद्धांतशिरोमणि, नैषधमहाकाव्य आणि जगांतील अत्युत्कृष्ट व सर्वांगसुंदर भावगीत (Lyric) असें गीतगोविंद हे ग्रंथ याच कालांत निर्माण झाले. या मध्ययुगीन गाढ व भयाण अंधकारांत खरोखर प्रकाश देणारे कोणते दिव्य तारे असतील, तर ते भोज आणि मम्मट, भास्कराचार्य आणि रामानुजाचार्य, जयदेव आणि श्रीहर्ष हेच तेजस्वी ग्रंथकार होत." 'संस्कृत वाङ्मयाचा इतिहास' (History of Sanskrit Literature) या विद्वन्मान्य ग्रंथांत डॉ. कीथ गीतगोविंदाबद्दल आपलें मत प्रकट करतांना सुंदरपणें शेरा देतात कीं, "जयदेवाचें गीतगोविंद हें एक अप्रतिम काव्य असून संस्कृतांतील वा आर्यावर्तांतील इतर कोणत्याहि काव्यापेक्षां तें अधिक सुरस व हृदयंगम आहे. या काव्याच्या रसभावानुकूल, अत्यंत मधुर व कुशल रचनासौष्ठवामुळें त्याचें मुळाबरहुकुम असें भाषांतर करणें केवळ अशक्यप्राय आहे; आणि भाषांतराची अशक्यता हीच जर सर्वोत्कृष्ट काव्याची कसोटी मानली तर जयदेवाचें गीतगोविंद हें सर्वोत्तम काव्यांतच गणलें गेलें पाहिजे यांत संदेह नाहीं." आधुनिक कविवर्य रवींद्रनाथ ठाकूर हे आपल्या लहानपणाच्या 'आठवणीं'त (Reminiscences) गीतगोविंदासंबंधीं पुढील उल्लेख करतात:—"गीतगोविंदाचें शब्दसौष्ठव व गीतमाधुर्य या दोहींमुळें या काव्याचीं माझ्या अंतरंगावर इतकीं आश्चर्यकारक व मधुर चित्रें उमटलीं कीं, माझ्या खास उपयोगासाठीं सबंध गीतगोविंदाची एक प्रत स्वतः लिहून घेतल्यावांचून मला चैन पडलें नाहीं." विशेषतः

‘ निभृतनिकुञ्जगृहं गतया निशि रहसि निलीय वसन्तम्। ’ इत्यादि सहाव्या प्रबंधानें त्यांच्या हृदयावर अगदीं मोहिनीच घातली होती.

संस्कृत वाङ्मयांत निदान तीन तरी ‘ जयदेव ’ झाले आहेत असें म्हणतां येईल. एक ‘ गीतगोविंद ’कार जयदेव, दुसरा ‘ प्रसन्न-राघव ’नाटककार जयदेव, व तिसरा ‘ चंद्रालोक ’कर्ता जयदेव. या तिघांपैकीं सुप्रसिद्ध गीतगोविंद काव्याचा कर्ता जो श्रीजयदेवकवि त्याविषयीं चरित्रात्मक माहिती मिळते तीहि फार नाहीं. याचा जन्म बंगाल्यांत उत्कलदेशांत जगन्नाथपुरींत किंदुबिल्व गांवीं ११ व्या शतकांत झाला. हा श्रीभोजदेव व श्रीराधादेवी अगर रमादेवी यांचा पुत्र होय. श्रीराधादेवीच्या अलौकिक पातिव्रत्यासंबंधीं अनेक आख्यायिका असल्या तरी विश्वसनीय माहिती उपलब्ध नाहीं. जयदेव हा परमकृष्णभक्त व महान् साधु होता. चंद्रदत्तकृत ‘ भक्तमाला ’ग्रंथाच्या ३९ ते ४१ सर्गांत व महीपतिकृत भक्तिविजयाच्या दुसऱ्या अध्यायांत जयदेवासंबंधीं आख्यायिका सुरसपणें वर्णिल्या आहेत; परंतु त्या ऐतिहासिक दृष्ट्या सर्वस्वीं अग्राह्य होत. तत्कालीन वंगदेशीय पराक्रमी राजा शककर्ता लक्ष्मणसेन ( याचा शकारंभ इ. स. १११९ ) याचे सभाद्वारावरील लेखांत जयदेवाचा उल्लेख आहे. या उत्कृष्ट कवीचे आणखीहि कांहीं ग्रंथ असावेत, पण गीतगोविंदाखेरीज त्याचा इतर कोणताच ग्रंथ उपलब्ध नाहीं व लिहिल्याचाहि उल्लेख कोठें आढळलेला नाहीं. तथापि या एकाच काव्यानें जयदेव अजरामर झाला आहे यांत शंका नाहीं. किंबहुना एकच वाङ्मयकृतीनें चिरंजीव झालेल्या ज्या थोड्या व्यक्ति असतील त्यांमध्यें जयदेव हाच अग्रगण्य ठरेल.

जयदेवाच्या गीतगोविंद काव्याचा विषय श्रीकृष्ण व राधा यांचा परस्पराविषयींचा अनुराग, विरह व मीलन हा असून कवीनें तो अप्रतिम नैपुण्यानें वर्णिला आहे. कवीनें संभोगविप्रलंभात्मक शृंगाररस तर मूर्तिमान् उभा केलाच आहे, पण जागोजाग कवीचें भक्तियुक्त मृदुल अंतःकरणहि दृग्गोचर होतें. भक्ति व शृंगार या दोन भरजरी सूत्रांनीं गीतगोविंदाचा काव्यपट जयदेवाच्या अलौकिक प्रतिभेनें विणला असून

कोणाहि रसिकाचें हृदय त्याच्या अनुपम कौशल्यानें वेधल्यावांचून राहत नाहीं. कांहीं ठिकाणीं शृंगाराचा उत्तानपणा अधिक झाला असला तरी, संस्कृत महाकवींच्या वर्णनांत तशा प्रकारचा अतिरिक्त शृंगार कोठें कोठें दिसून येत असल्यामुळें जयदेवासच त्याबद्दल विशेष दोष देतां येत नाहीं. तथापि एवढें मात्र खास म्हणतां येईल कीं, अशीं स्थळें या काव्यांतून कवीनें वगळलीं असतीं तरी त्याच्या कीर्तिमंदिरास अणुमात्रहि उणेपणा आला नसता. कारण त्याची उज्ज्वल प्रतिभा इतर सर्व काव्यभर पदोपदीं दिसून येते व तेवढ्यानेंहि महाकविमालिकेंत जयदेव विराजमान होण्यासारखाच आहे, यांत संशय रहात नाहीं.*

गीतगोविंदाचें संविधानक साधेंच असून तें सुश्लोकगोविंदाच्या प्रत्येक सर्गारंभीं थोडक्यांत दिलें असल्यामुळें त्याची येथें पुनरावृत्ति करण्याचें प्रयोजन नाहीं. श्रीकृष्ण हा नायक, राधा ही नायिका व तिची एक सखी अशा तीनच व्यक्ति प्रस्तुत काव्यांतील पात्रें होत. राधेची सखी ही मध्यस्थ असून ती नायकनायिकांच्या अवस्था व निरोप एकमेकांस निवेदन करते, व नायकनायिकांचें मीलन घडवून आणते. कवीचा उद्देश नायकनायिकांच्या प्रणयाच्या ( निराशा व चिरवियोग खेरीज करून ) अनुराग, विरह, उत्कण्ठा व मीलन इत्यादि अवस्था मधुर शब्दांत वर्णन करण्याचा असावा असें स्पष्ट दिसतें. तसेंच संस्कृत साहित्यशास्त्रज्ञांनीं वर्णिलेले नायिकांचे अभिसारिका, वासकसज्जा, विप्रलब्धा, खण्डिता, कलहान्तरिता, मानिनी इत्यादि बहुतेक सर्व प्रकार जयदेवानें मोठ्या खुबीनें प्रस्तुत काव्यांत आणले असून ते बहारीनें वर्णन केले आहेत. जयदेव ते ते प्रसंग इतक्या समर्पक शब्दांत वर्णन करतो कीं, सर्व वर्ण्यविषय वाचकाच्या मनश्चक्षूसमोर मूर्तिमंत उभा करण्याचें सामर्थ्य,

---

* प्रसिद्ध इतिहाससंशोधक, कवि व नाटककार कै. वासुदेवशास्त्री खरे हे एका अप्रकाशित स्फुट काव्यांत म्हणतातः—

“ कालिदास, भवभूति, भारवी, बाण, दंडि, जयदेवसे कवी।
कां न येति उदयासि सांप्रत ? हर्षपूरित करूं जगाप्रत ॥ ”

शास्त्रीबुवांना गीतगोविंद काव्यहि फार प्रिय होतें. (खरे चारित्र पृ. ९२ व १३१)

जें रससिद्ध कवींवांचून अन्यत्र कोठेंहि आढळत नाहीं, तें त्याच्या 'मधुरकोमलकान्तपदावली'युक्त सरस्वतींत खरोखरच अपरंपार भरलें आहे, याविषयीं वाचकास संदेह रहात नाहीं.

गीतगोविंदाच्या रचनेंतदेखील जयदेवानें अनेक प्रकारें विविधता व वैचित्र्य साधलें असून त्यामुळें अथपासून इतिपर्यंत वाचकास कंटाळा न येऊं देणें हें जें उत्कृष्ट काव्याचें एक लक्षण तें त्यांत उत्तमपणें दिसतें. गेय अशा अनुरूप रागतालबद्ध संगीतांत जयदेवानें चोवीस प्रबंध अथवा अष्टपद्या रचल्या असून त्यांची काव्याच्या बारा सर्गांत विषम विभागणी केली आहे. प्रत्येक प्रबंधाच्या आधीं व नंतर विविध आणि सर्वमान्य अशा वृत्तांत अनेक सुरस श्लोक रचले असून, प्रबंध व श्लोक यांच्या परस्परसन्निकर्षानें गीतगोविंदाच्या मनोरमतेंत अतिशयच भर पडली आहे. ताजमहाल ज्याप्रमाणें दुनियेंतील साऱ्या मंदिरांत सर्वांगसुंदर (Perfect) म्हणतात, त्याचप्रमाणें गीतगोविंद हेंहि जगांतील एक सर्वांगसुंदर असें काव्य होय. प्रत्येक प्रबंधांत सामान्येंकरून आठ कडवीं अगर पद्यें असल्यामुळें 'प्राधान्येन निर्देशः' या न्यायानें त्यास अष्टपदी असें नांव देण्यांत आलें आहे. तथापि कांहीं कांहीं प्रबंधांत ही पद्यसंख्या कमी अधिक असल्यामुळें अष्टपदी हें नांव त्यांस तितकें यथार्थतेनें लागूं पडत नाहीं. म्हणून अष्टपदीपेक्षां प्रबंध हेंच नांव अधिक प्रशस्त वाटतें. अशा तऱ्हेच्या गेय चालीची रागदारींतील रचना इतर कोणत्याहि प्राचीन संस्कृत कवीची फारशी प्रसिद्ध अशी आढळत नाहीं. यावरून जयदेवानें आपल्या आवडत्या श्रीकृष्णाच्या शृंगारलीला वर्णन करण्यासाठीं गीत-गोविंदांत हीं गेय चालींचीं पद्यें घालण्याची अभिनव कल्पना प्रथमच काढली असें म्हणावयास हरकत नाहीं. जयदेवाचें हें एक वैशिष्ट्य होय. तसेंच जयदेवाचें या बाबतींत अनुकरणहि कोणीं फारसें केलेलें आढळत नाहीं.*

---

* प्रो केशवलाल हर्षदराय ध्रुवकृत गुजराथी गीतगोविंदाचे विवेचक विस्तृत प्रस्तावनेंत जयदेव कवीचें अनुकरण करणारे कांहीं ग्रंथ दिले आहेत ते असेः-(१) भानुदत्तकृत 'गीतगौरीपति' (इ. स. १४ वें शतक पूर्वार्ध). (२) विष्णुसुत कल्याणकृत 'गीतगङ्गाधर'. (३) श्रीनाथभट्टसुत राम अगर रामजित्-

याला कारण कदाचित् कवीची संगीतानभिज्ञता व उच्च दर्जाच्या कविप्रतिभेचा अभाव हेंच असावें. मात्र आपल्या महाराष्ट्रकविवृंदापैकीं 'कविराय' रामजोशी या रंगेल कवीनें—ज्यास शृंगाररसप्रधान लावण्यांच्या कर्तृत्वामुळें 'महाराष्ट्र-बायरन्' असेंहि कित्येक मौजेनें म्हणतात त्या रामजोशीनें—बहुतेक, गीतगोविंदाच्या संगीताचें व प्रियाराधनाचेंच अनुकरण करून कांहीं मनोहर पद्यरचना केली आहे, त्याचा एकच मासला पहाः—

तरुणि तवेदं कुचतटमतिगुरु कुरु मम हृदि सादरम् ।
मनो मे भवति मनोभवदरम् ॥ ध्रु० ॥
अधुरमधुरसरसिकं मामुज्जीवय तावकम् ।
प्रिये मे शमय विरहपावकम् ॥
मुञ्चति मदनः स्वीकृतकदनो मयि विषमं सायकम् ।
निवारय तं सखि रतिनायकम् ॥
कोपादरुणं कुरु मयि करुणं रुचिनिर्जितधावकम् ।
दृगन्तं पाहि निजं सेवकम् ॥
जहि जहि मानं त्यज मयि मौनं अनुकुरुषे किं बकम् ।
त्वदीयं लपितं सुखयति न कम् ॥
चालः— त्वं मुधा भजसि मयि रुषं किमिति कातरे ।
किं कृतं मया वरभामिनि रुचिराधरे ।
कुरु कृपामरुणरुचिपल्लवकोमलकरे ।
साहसं किमिदमतिकोपभरे मन्थरे ।
मञ्जुलतरमृदुसिञ्जितमणिमयमञ्जीरद्युतिधरम् ।
नतोऽहं तावकपदपुष्करम् ॥

( प्रो. परांजपेकृत केकावलीटीकेंतील उतारा

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

कृत 'गीतागिरीश'. हीं तीनहि शैव अनुकरणें होत. (४) मैथिल कृष्णदत्तकृत 'गीतगोपीपति'. कृष्णदत्तानें जयदेवकृत गीतगोविंदावर कृष्णपर व शिवपर अशी दुहेरी टीका केलेली आहे. मेघदूताच्या अनुकरणपर जशीं अनेक दूतकाव्यें झालीं, तशींच हींहि काव्यें होत. मात्र जयदेवाचें श्रेष्ठत्व अबाधितच आहे.

हा उतारा गीतगोविंदाच्या १२ व्या सर्गांतील–

‘ अधरसुधामुपनय भामिनि जीवय मृतमिव दासम् ।’

इत्यादि ( प्रबंध २३–५ ), तसेंच दहाव्या सर्गांतील ‘ प्रिये चारुशीले ’ इ. प्रबंधांतील कांहीं भागाशीं व

‘ सिञ्जाना मञ्जु मञ्जीरं प्रविवेश निवेशनम् ’ (स.११-७)

यांच्यांशीं तुलना करण्यासारखा आहे. त्यावरून अर्वाचीन कविराजानें प्राचीन कविराजाचा थाट कसा उचलला आहे तें पाहणें चिकित्सकास मौजेचें वाटेल; आणि शृंगाररसानुकूल अत्यंत मधुर अशी भाषा किंवा वेंचक शब्दयोजना किती आल्हादकारक होते तें प्रत्ययास येईल.

जयदेवानें गीतगोविंदांत शृंगाररस परमावधीचा ओतला आहे हें तर खरेंच, पण अनेक सहृदयानंददायी काव्यालंकारांनींहि त्यानें आपल्या कृतींत फारच बहार केली आहे. विविध प्रकारचीं कर्णमधुर यमकें, अनेक तऱ्हेचे अनुप्रास इत्यादि शब्दालंकारांची सहजनिर्मित पखरण त्यानें आपल्या काव्यांत चहूंकडे ओतप्रोत पण चतुराईनें भरली आहे. तसेंच उपमा, रूपकें, उत्प्रेक्षा, अपह्नुति, मुद्रा, श्लेष, अर्थान्तरन्यास इत्यादि अलंकारांचेहि पुंज या गीतगोविंदरूपी मंजूषेंत जागोजाग आढळून येतात. यांतील कांहीं श्लोक प्रसिद्ध साहित्यशास्त्रज्ञांनीं विशिष्ट अलंकारांचीं सुंदर उदाहरणें म्हणून आपल्या सर्वमान्य ग्रंथांत उद्धृत केलेलीं आहेत. ‘ काव्यप्रकाश ’कार मम्मट यानें ‘ उन्मीलन्मधुगन्धलुब्धमधुपव्याधूतचुताङ्कुर– ’ ( स. १–९ ) हा श्लोक अनुप्रासाचें उदाहरण म्हणून दिला आहे. ‘ साहित्यदर्पण ’कार विश्वनाथ यानेंहि ‘ हृदि बिसलताहारो नायं भुजङ्गमनायकः ’ ( स. ३–३ ) इत्यादि श्लोक ‘निश्चय’ अलंकाराचें उदाहरण म्हणून घेतला असून या श्लोकांत भासमान होणाऱ्या अपह्नुति, भ्रांतिमान् इ. अलंकारांची छाननी करून ते ते अलंकार यांत होऊं शकत नाहींत असें त्यानें प्रतिपादन केलें आहे. तसेंच ‘ कुवलयानंद ’कार अप्पय्य दीक्षित यानें गीतगोविंदांतील पहिलाच ‘ मेघैर्मेदुरमम्बरं ’ हा श्लोक प्रहर्षण नामक अलंकाराचें उदाहरण म्हणून दाखल केलेला आहे. यांवरून गीतगोविंद काव्य प्राचीन

कालापासूनच कसें विद्वन्मान्य व लोकप्रिय झालें आहे याची वाचकास कांहीं कल्पना होईल.

जयदेव हा भक्त, साधु, पंडित व कविराजराज इत्यादि प्रकारांनीं प्रसिद्ध आहे. तथापि जयदेवानेंच स्वकाव्यांत स्वतःविषयींच्या प्रौढीचे कांहीं दर्पोद्गार काढले आहेत, व आरंभींच्या चवथ्या श्लोकांत ( या श्लोकाचें रूपांतर मीं सुश्लोकगोविंदांत मुद्दाम केलेलें नाहीं– ) त्याचे समकालीन कवि–उमापति, धोयी, शरण व आचार्यगोवर्धन यांचा उल्लेख केला असून, आपण स्वतः या इतर कवींहून कोणत्या गुणांत श्रेष्ठ आहों तें प्रतिपादन केलें आहे. या दर्पोक्ति सदभिरुचीस तितक्याशा पोषक वाटत नाहींत. हल्लींच्या काळीं निवडणुकींत आपणास निवडून द्यावें म्हणून उमेदवार जसा ' मॅनिफेस्टो ' काढतात, त्याहूनहि अधिक बढाईखोर प्रकार या प्रसंगीं कवीनें प्रकट केला आहे, असें कष्टानें म्हणावें लागतें. अशा दर्पोक्तींचे बाबतींतहि आमच्या कवीचें साम्य, स्वतःस ' कविरायाहुनि कवि ' म्हणविणाऱ्या रामजोशीशीं जुळत असून संस्कृतकवि ' रसगङ्गाधर ' कर्ता जगन्नाथराय याच्याशींहि कांहीं अंशीं दृग्गोचर होत आहे, असें वाटूं लागतें. जगन्नाथाच्या दर्पोक्ति भामिनीविलासांत अनेक आहेत. उदाहरणार्थ शान्तविलासांतील—

निर्माणे यदि मार्मिकोऽसि नितरामत्यन्तपाकद्रव–
न्मृद्वीकामधुमाधुरीमदपरीहारोद्धुराणां गिराम् ।
काव्यं तर्हि सखे सुखेन कथय त्वं संमुखे मादृशां
नो चेद्दुष्कृतमात्मना कृतमिव स्वान्ताद्बहिर्मा कृथाः ॥३०॥
धुर्यैरपि माधुर्यैर्द्राक्षाक्षीरेक्षुमाक्षिकसुधानाम् ।
वन्द्यैव माधुरीयं पण्डितराजस्य कवितायाः ॥३१॥

हीं पद्यें गीतगोविन्दांतील बाराव्या सर्गाच्या शेवटच्या कांहीं श्लोकांतील दर्पोक्तींशीं किती तरी जुळतात. या साम्यावरून – गुणसाम्य व दोषसाम्य या दोन्ही दृष्टींनीं विचार करतां जगन्नाथरायानें जयदेवकवीची शैली कांहीं बाबतींत तरी चांगलीच मनःपूर्वक उचलली आहे असें अनुमान केलें, तर तें धाडसाचें होईल, असें वाटत नाहीं. तसेंच, इतरहि

कांहीं स्थळीं जगन्नाथास आपल्या कल्पना जयदेवकृतीवरून सुचल्या असाव्या असा तर्क करतां येण्यास थोडी तरी जागा आहे, असें खालील साम्यस्थळें वाचून कोणाहि चिकित्सकास वाटेल. विस्तारभयास्तव थोडींच उदाहरणें दाखल केलीं आहेत:—

## जयदेव

(१) साध्वी माध्वीक चिन्ता न भवति भवतः शर्करे कर्कशासि
द्राक्षे द्रक्ष्यन्ति के त्वाममृत मृतमसि क्षीर नीरं रसस्ते
माकन्द क्रन्द कान्ताधर धरणितलं गच्छ यच्छन्ति भावं
यावच्छृङ्गारसारस्वतमिह जयदेवस्य विश्वग्वचांसि ॥ १२–१२

(२) मा कुरु मानिनि मानमये । ( प्र. १८ ध्रु. )

(३) कन्दर्पज्वरसंज्वराकुलतनोराश्चर्यमस्याश्चिरं
चेतश्चन्दनचन्द्रमःकमलिनीचिन्तासु संताम्यति
किंतु क्षान्तिवशेन शीतलतनुं त्वामेवमेकं प्रियं
ध्यायन्ती रहसि स्थिता कथमसौ क्षीणा क्षणं प्राणिति स. ४–५

क्षणमपि विरहः पुरा न सेहे नयननिमीलनखिन्नया यया ते ।
श्वसिति कथमसौ रसालशाखां चिरविरहेण विलोक्य पुष्पिताग्राम् स. ४-६

## जगन्नाथ

(१) मृद्वीका रसिता सिता समशिता स्फीतं निपीतं पयः
स्वर्यातेन सुधाप्यधायि कतिधा रम्भाधरः खण्डितः
सत्यं ब्रूहि मदीय जीव भवता भूयो भवे भ्राम्यता
कृष्णेत्यक्षरयोरयं मधुरिमोद्गारः क्वचिल्लक्षितः । ७ शांतविलास

(२) मुग्धे मा कुरु मानमाननमिदं राकापतिर्जेष्यति ।५२ शृंगारविलास

(३) पाटीरद्रुभुजङ्गपुङ्गवमुखायाता इवातापिनो
वाता वान्ति दहन्ति लोचनममी ताम्रा रसालद्रुमाः
एते हन्त किरन्ति कूजितमयं हालाहलं कोकिला
बाला बालमृणालकोमलतनुः प्राणान्कथं रक्षतु ५७
शृंगारविलास

यांशिवाय चिकित्सक पंडितांस आणखीहि अनेक साम्यस्थलें उभय-कवींच्या सुमधुर कृतींतून काढून देतां येतील. उपरिनिर्दिष्ट साम्यांवरून जयदेव हा जगन्नाथरायाचा अत्यंत आवडता कवि असावा, एवढा तरी निष्कर्ष काढतां येईल. स्वतःविषयींच्या गौरवाचे उद्गार काढणें नेहमींच तितकें दोषावह गणलें जात नाहीं हें खरें. यथार्थ आत्मप्रशंसा गर्ह्य समजली जाऊं नये. ‘ आत्मप्रशंसा दोषः स्यान्न तु भूतार्थशंसिनः ’ या न्यायानें जयदेवादि श्रेष्ठ कवींचे आत्मप्रौढीचे उद्गार क्षम्य मानणेंच युक्त होईल. बलाढ्य मल्लानें रंगणांत उतरल्यावर दंड थोपटून गर्जना केली, तर फारसें बिघडलें कोठें !

चांगले चांगले कविसुद्धां आत्मप्रौढीचे उद्गार कां काढीत असावेत, या प्रश्नास दुसरीहि एक बाजू संभवते: हे उद्गार म्हणजे बहुधा समकालीन निंदक कविब्रुवांना दिलेले कोरडे होत. निंदकांची द्विजिह्वा द्वेषमत्सरमूलक गरल ओकूं लागली, म्हणजे सत्कवींनाहि तीस ठेचून गप्प बसविणें भाग पडतें; व याच कारणानें प्रायः आत्मश्लाघेच्या कव्युक्ति प्रथमतः बाहेर पडल्या असाव्यात. निंदकांचे उद्गार त्यांच्या कुकवित्वानें कालाच्या भक्ष्यस्थानीं पडून केव्हांच नाहींसे झाले असणार. मात्र, सत्कवींनीं त्यांना दिलेलीं उत्तरें त्यांच्या इतर काव्यगुणांमुळें वाङ्मयांत चिरंजीवित्व पावलीं असावींत.निंदकांचीं प्रत्यक्ष नांवें घेऊन जर हीं उत्तरें दिलीं गेलीं असतीं, तर ते निंदकहि त्यांबरोबरच अजरामर झाले असते ! परंतु मुद्दामच हीं नांवें गाळलेलीं असतात. कालिदासानें दर्पोक्ति न काढण्याचें कारण कदाचित् त्याच्या सुदैवानें त्यास प्रतिस्पर्धी निंदक कोणीहि नसावा. मेघदूतांतील—

दिङ्नागानां पथि परिहरन्स्थूलहस्तावलेपान् ॥ १४ ॥

या श्लोकपादांत निंदक प्रतिस्पर्ध्यास दिलेल्या एका टोमण्याचा ‘ ध्वनि ’ आहे, असा मल्लिनाथानेंहि श्लेष काढला आहे हें खरें; परंतु हा तर्क निराधार अतएव केवळ ‘ मल्लिनाथी ’ होय, असेंच मानण्याकडे पुष्कळ विद्वानांचा कल वाहतो हेंहि तितकेंच सत्य आहे. असो.

जयदेवानें आपल्या काव्यांत गौडी रीतीचा अवलंब बऱ्याच अंशीं केला आहे. दीर्घसमासत्व हा या रीतीचा विशेष होय. परंतु कांहीं स्थळीं

[ उदाहरणार्थ, प्रबंध १,२,७,९,१०,१२,१३,१८,१९ इत्यादिक स्थळीं ] त्यानें अतिशय सोप्या व लघु शब्दांत प्रसादगुणयुक्त वर्णन केलें असल्यामुळें, ते ते भाग वैदर्भी रीतीचे उत्कृष्ट नमुने म्हणतां येण्याजोगे आहेत. असे नमुने कालिदासाच्या वैदर्भीरीतिविशिष्ट कोणत्याहि वाङ्मयाशीं तोलून पाहण्यासारखे आहेत. सारांश, गौडी व वैदर्भी या दोहों रीतींचा उपयोग अतिशय निष्णातपणानें जयदेवानें केला असल्यामुळें त्याचें सव्यसाचित्व चांगलेंच निदर्शनास येतें. कालिदास मेघदूतांत वा इतरत्र [ ‘ दृङ्मनःसङ्गसंकल्पा जागरः कृशता रतिः। ह्रीत्यागोन्माद-मूर्च्छान्ता इत्यनङ्गनदशा दश ’ अशाप्रकारें ] पद्धतशीरपणें नायकनायिकांच्या अनङ्गदशा वर्णन करतो. तसेंच जयदेवानें न चुकतां ते ते सर्व भाव व दशा तपशीलवार देऊन नायकनायिकांचें वर्णन केलेलें आहे, (स.४-३, ५-३, प्र. १०, प्र. ९ इत्यादि) तें पाहण्यासारखें आहे. संस्कृत वाङ्मयांत शृंगारिक वर्णनें अनेक कवींनीं केलीं असलीं तरी, कालिदास, जयदेव व जगन्नाथ या तीन कवींनीं शृंगाररसमय वर्णन करण्यांत आपलें वैशिष्टय प्रकट केलें आहे, असें म्हणावयास फारसा प्रत्यवाय नाहीं. रसिक व चिकित्सक वाचकास या कवित्रयाच्या शृंगारवर्णनांत अनेक दृष्टींनीं साम्य आढळेल. जयदेव व जगन्नाथ यांचीं सादृश्यस्थलें वर निर्दिष्ट केलींच आहेत. येथें कालिदास व जयदेव यांच्यांतील सूक्ष्मसाम्यदर्शक कल्पनांचे उतारे दिल्यास अस्थानीं होणार नाहींत अशी आशा आहे:–

**कालिदास**

(१) त्वामालिख्य प्रणयकुपितां धातुरागैः शिलाया–
मात्मानं ते चरणपतितं यावदिच्छामि कर्तुम्।
अस्रैस्तावन्मुहुरुपचितैर्दृष्टिरालुप्यते मे
क्रूरस्तस्मिन्नपि न सहते सङ्गमं नौ कृतान्तः॥ उत्तरमेघ ४२

(२) भित्वा सद्यः किसलयपुटान्देवदारुद्रुमाणां
ये तत्क्षीरस्रुतिसुरभयो दक्षिणेन प्रवृत्ताः।
आलिङ्ग्यन्ते गुणवति मया ते तुषाराद्रिवाताः
पूर्वं स्पृष्टं यदि किल भवेदङ्गमेभिस्तवेति॥ उत्तरमेघ ४४

(३) भूयश्चाह त्वमपि शयने कण्ठलग्ना पुरा मे
निद्रां गत्वा किमपि रुदती सस्वनं विप्रबुद्धा
सान्तर्हासं कथितमसकृत्पृच्छतश्च त्वया मे
दृष्टः स्वप्ने कितव रमयन्कामपि त्वं मयेति ॥ उत्तरमेघ ४८

**जयदेव**

(१) विलिखति रहसि कुरङ्गमदेन भवन्तमसमशरभूतम्
प्रणमति मकरमधो विनिधाय करे च शरं नवचूतम् । स. ४ प्र. ८।५

(२) नामसमेतं कृतसंकेतं वादयते मृदुवेणुम् ।
बहु मनुते ननु ते तनुसंगतपवनचलितमपि रेणुम् । स. ५ प्र. ११-३

(३) विशङ्कमाना रमितं कयापि
जनार्दनं दृष्टवदेतदाह ॥ स. ७-४

तसेंच, जयदेवाची–( स. ११, प्र. २०-३ मधील )

कुसुमशरासनशासनबन्दिनि पिकनिकरे भज भावम् ।

ही कल्पना रघुवंशाच्या—

त्यजत मानमलं बत विग्रहैर्न पुनरेति गतं चतुरं वयः ।

परभृताभिरितीव निवेदिते स्मरमते रमते स्म वधूजनः ॥ स. ९।४७

या श्लोकांतील, कोकिला आपल्या कूजनानें ' दंपतीनो, भांडूं नका; यौवनसुखाचा उपभोग एकमेकांवर न रुसतां घ्या ! ' अशा अर्थाचा मदनाचा संदेशच जणूं काय सांगत असतात, या कल्पनेशीं बरीचशी जुळत नाहीं काय ? आणखीहि एकदोन उदाहरणें देण्यासारखीं आहेत. गीतगोविंदांत सर्ग ११ श्लो. ६ मध्यें सखी राधेस म्हणते, ' तूं भ्रूक्षेपाच्या किंमतीनें कृष्णास दास म्हणून विकत घेतलें आहेस.'–अशाप्रकारें कोणत्यातरी मूल्यानें विकत घेण्याची कल्पना कुमारसंभवांतहि आली आहेः–

अद्यप्रभृत्यवनताङ्गि तवास्मि दासः क्रीतस्तपोभिरिति वादिनि चन्द्रमौलौ ।
अह्नाय सा नियमजं क्लममुत्ससर्ज क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते ॥ ५-८६

त्याचप्रमाणें गीतगोविंद प्र. २३-२ मधील पादसंवाहनाची कल्पना शाकुन्तलांतील ( अं. ३-२० )—

किं शीतलैः क्लमविनोदिभिरार्द्रवातान्संचारयामि नलिनीदलतालवृन्तैः ।
अङ्के निधाय करभोरु यथासुखं ते संवाहयामि चरणावुत पद्मताम्रौ ॥

या श्लोकाच्या उत्तरार्धाशीं तुलना करण्यासारखी आहे.

तसेंच जयदेवाची श्लोकरचना श्रीमद्भागवत दशमस्कंध पूर्वार्ध यांतील रासपंचाध्यायीशीं ( अध्याय २९ ते ३३ ) माधुर्यांत, शृंगारांत, विरहोद्गारांत व काव्यसौंदर्यांत पुष्कळच सदृश आहे. विस्तारभयास्तव थोडींच उदाहरणें देत आहें. गीतगोविंदांतील सातव्या सर्गाच्या आरंभीं चंद्रोदयवर्णनाचा एक सुंदर श्लोक आहे—

अत्रान्तरे च कुलटाकुलवर्त्मघातसंजातपातक इव स्फुटलाञ्छनश्रीः ।
वृन्दावनान्तरमदीपयदंशुजालैर्दिक्सुन्दरीवदनचन्दनबिन्दुरिन्दुः ॥१॥

हा श्लोक रासपंचाध्यायींतील पहिल्या अध्यायांत असलेल्या चन्द्रवर्णनपर श्लोकाच्या सौंदर्याशीं तोलून पाहण्यासारखा आहेः—

तदोडुराजः ककुभः करैर्मुखं प्राच्या विलिम्पन्नरुणेन शंतमैः ।
स चर्षणीनामुदगाच्छुचो मृजन्प्रियः प्रियाया इव दीर्घदर्शनः ॥२॥

शिवाय, गीतगोविन्दाच्या चवथ्या प्रबंधांतील रासवर्णन भागवतांतील पुढील उताऱ्याशीं पुष्कळच जुळतेंः—

उच्चैर्जगुर्नृत्यमाना रक्तकण्ठ्यो रतिप्रियाः ।
कृष्णाभिमर्शमुदिता यद्गीतेनेदमावृतम् ३३-९
काचित्समं मुकुन्देन स्वरजातीरमिश्रिताः ।
उन्निन्ये पूजिता तेन प्रीयता साधु साध्विति ।
तदेव ध्रुवमुन्निन्ये तस्मै मानं च बह्वदात् १०
काचिद्रासपरिश्रान्ता पार्श्वस्थस्य गदाभृतः ।
जग्राह बाहुना स्कन्धं श्लथद्वलयमल्लिका ११
तत्रैकांऽसगतं बाहुं कृष्णस्योत्पलसौरभम् ।
चन्दनालिप्तमाघ्राय हृष्टरोमा चुचुम्ब ह १२
कस्याश्चिन्नाट्यविक्षिप्तकुण्डलत्विषमण्डितम् ।
गण्डं गण्डे संदधत्या अदात्ताम्बूलचर्वितम् १३

नृत्यन्ती गायती काचित्कूजन्नूपुरमेखला ।
पार्श्वस्थाऽच्युतहस्ताब्जं श्रान्ताधात्स्तनयोः शिवम् १४

आणखी एकच महत्त्वाचा उतारा दिल्यास, जयदेवानें श्रीमद्भावत स्कं. १०, अ. ४० यांतील अक्रूरस्तुतिपैकीं दशावतार स्वरूपांचें वर्णन गीतगोविन्दाच्या प्रथम प्रबंधांतच कसें थोडेंफार बदल करून स्वीकारलें आहे तें वाचकांस कळून येईलः—

नमः कारणमत्स्याय प्रलयाब्धिचराय च ।
हयशीर्ष्णे नमस्तुभ्यं मधुकैटभमृत्यवे १७

अकूपाराय बृहते नमो मन्दरधारिणे ।
क्षित्युद्धारविहाराय नमः सूकरमूर्तये १८

नमस्तेऽद्‌भुतसिंहाय साधुलोकभयापह ।
वामनाय नमस्तुभ्यं क्रान्तत्रिभुवनाय च १९

नमो भृगूणां पतये दृप्तक्षत्रवनच्छिदे ।
नमस्ते रघुवर्याय रावणान्तकराय च २०

नमस्ते वासुदेवाय नमः संकर्षणाय च ।
प्रद्युम्नायानिरुद्धाय सात्वतां पतये नमः २१

नमो बुद्धाय शुद्धाय दैत्यदानवमोहिने ।
म्लेच्छप्रायक्षत्रहन्त्रे नमस्ते कल्किरूपिणे २२

विस्तारभयास्तव तुलनेचें हें विवेचन येथेंच आटोपतें घेऊन दुसऱ्या एका कुतूहलजनक विषयाकडे वळतों.

गीतगोविंदाच्या प्रत्येक सर्गास कांहीं विशिष्ट नाम दिलें असून बहुधा त्या त्या सर्गांतील शब्दावरून किंवा विषयावरून हीं नामें सुचलीं आहेत. सकृद्दर्शनीं तीं कांहींशीं विलक्षण वाटतात यांत शंका नाहीं. त्यामुळेंच त्यांची उपपत्ति लावण्याचा यत्न करणें एकादें शब्दकूट सोडविण्याइतकेंच मनोरंजक आहे.

पहिल्या सर्गाचें ‘ सामोददामोदर ’ हें नांव सर्गांतींच्या श्लोकांतील ‘ स्मितमनोहारी हरिः ’ यावरून व प्र. ४ मधील रासलीलेंत दंग झालेल्या

कृष्णावरून सुचलें असावें. दुसऱ्या सर्गाचें अभिधान ‘ अक्लेशकेशव ’ हेंहि त्या सर्गाच्या अंतिम श्लोकांतील ‘ हरतु वः क्लेशं नवः केशवः ’ या शब्दांवरून दिलें गेलें असावें. त्याचप्रमाणें तिसऱ्या सर्गाच्या शेवटच्या पद्यांतील ‘ संमुग्धं मधुसूदनस्य ’ इ. शब्दांवरून ‘ मुग्धमधुसूदन ’ हें नाम त्या सर्गास मिळालें आहे. पण चवथ्या सर्गास ‘ स्निग्धमाधव ’ म्हटलें आहे, तें त्या सर्गाच्या पहिल्याच श्लोकांत ‘ प्रेमभरोद्भ्रान्तं माधवं ’ इत्यादि पदांवरून सुचलें असावें, असा कांहींसा दूरान्वित तर्क केल्यावांचून तरणोपाय नाहीं. ‘ साकाङ्क्षपुण्डरीकाक्ष ’ हें ५ व्या सर्गाचें नामकरण कदाचित् त्या सर्गांतील श्लोक २ व ३ यांतील राधेच्या मीलनाची आकांक्षा धारण करणाऱ्या कृष्णाच्या वर्णनावरून केलेलें असावें असा तर्क वाहतो. साहव्या सर्गाच्या शेवटच्या श्लोकांतील वर्णन ‘ सोत्कण्ठवैकुण्ठ ’ हें नांव सुचण्यास आधार झालें असेल काय, अशी शंका येते; पण तें तितकेंसें समर्पक वाटत नाहीं. सातव्या सर्गास ‘ नागरनारायण ’ म्हटलें आहे, तें कदाचित् त्या सर्गांतील प्रबंध १५ मध्यें वर्णन केलेल्या कृष्णाच्या कल्पित चतुर रतिलीलेवरून देण्यांत आलें असेल. आठव्या सर्गाचे अंतीं वर्णिलेला राधाकृष्णांच्या वेषांचा नकळता अदलाबदल लक्षांत घेतला म्हणजे, त्या सर्गास दिलेलें ‘ विलक्षलक्ष्मीपति ’ उपपद योग्यच आहे, असें म्हणतां येईल. पण पुढें नवव्या सर्गास ‘ मुग्धमुकुन्दवदन ’ ही संज्ञा कशी लाभली, याची उपपत्ति कळत नाहीं. दहाव्या सर्गात, राधिकेशीं नर्मभाषण करण्यांत श्रीकृष्णाचें चातुर्य दिसून येत असल्यामुळें या सर्गास ‘ चतुरचतुर्भुज ’ असें म्हणण्यांत आलें आहे, त्यांतील औचित्य कळून येईल. एकादश सर्गांतील सातव्या श्लोकांत ‘ सानन्दं गोविन्दे ’ हीं पदें आल्यामुळें या सर्गास ‘ सानन्दगोविन्द ’ हें अभिधान सुचणें संभवनीयच आहे; आणि शेवटच्या सर्गास ‘ प्रीतपीताम्बर ’ म्हणण्याचें कारण त्या सर्गाच्या ११ व्या श्लोकांतील ‘ इति निगदितः प्रीतः पीताम्बरोऽपि तथाकरोत् ’ या शब्दांत स्पष्टच दिसतें आहे. असो. ही उपपत्ति कितपत सयुक्तिक आहे, तें चिकित्सकांनीं ठरवावें.

उत्कृष्ट काव्याचीं विद्वानांनीं ( कोल्हटकरांचा लेखसंग्रह पृ. ६३७ ) तीन प्रमुख लक्षणें सांगितलीं आहेत तीं अशीं:—

१. कालांतर, म्हणजे पुष्कळ काल टिकून राहणें,
२. पाठांतर, नेहमीं रसिकांच्या वाचनांत असणें, व
३. वेषांतर अगर भाषांतर, इतर भाषांतून त्याचें भाषांतर होणें.

हीं तीनीं लक्षणें गीतगोविंदास उत्तमप्रकारें लागू पडतात. कांहीं विशिष्ट गुण उत्कटत्वानें असल्यावांचून कोणतेंच काव्य चिरकाल टिकून राहणार नाहीं. असेंच काव्य रसिकांच्या जिह्वाग्रीं राहून नेहमीं पाठांतर केलें जातें; व इतर भाषेंतहि भाषांतरें व्हावयाचीं झाल्यास तीं असल्या गुणवान् काव्यांचींच होणार. पहिल्या दोन कसोटींतून गीतगोविंद उत्कृष्टपणें उतरलेलें आपण पाहतोंच. शिवाय गीतगोविंदानें भाषांतरांतहि अनेक अवतार धारण केले आहेत. पाश्चात्य विद्वानांस गीर्वाण भाषेचा परिचय घडला तेव्हांच लॅटिन, जर्मन, फ्रेंच, इंग्लिश इत्यादि भाषेंत गीतगोविंदाचीं भाषांतरें झालीं, व त्यांयोगानें गटेसारखे महाकवीहि या काव्याच्या मधुर आस्वादानें मोहून गेले. लॅटिनमधील भाषांतर ख्रिश्चन लॅसन् ( १८००-१८७६ ) या विख्यात जर्मन भाषापंडितानें १८३७ त प्रसिद्ध केलें. पण त्याहि पूर्वी सर वुइल्यम् जोन्स ( १७४६-१७९४ ) यानें इंग्रजी कवितेंत गीतगोविंदाचें भाषांतर केलें होतें; व युरोपमध्यें गीतगोविंदाची योग्यता या जोन्सकृत भाषांतरावरूनच प्रथमतः विदित झाली असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. सर एड्विन् आर्नोल्ड (१८३२-१९०४) यानेंहि आपल्या ‘ इंडिअन् साँग ऑफ् साँग्ज ’ या पुस्तकांत १८७५ त गीतगोविंदाचें इंग्रजी कविताबद्ध रूपांतर केलें आहे. त्यांत पहिले ११ च सर्ग असून १२ वा सर्ग पाश्चात्य रीतरिवाजास अनुसरून नसल्यानें भाषांतरित केलेला नाहीं. एकंदर भाषांतरहि शब्दशः नसून अनुवादात्मक केलें आहे. क्वचित् मूळ संस्कृत ध्रुवपद आर्नोल्ड मौजेनें तसेंच ठेवतो. उदाहरणार्थ ‘ मा कुरु मानिनि मानमये ’ या ९ व्या सर्गांतील प्रबंधाच्या पहिल्याच कडव्याचें रूपांतर पहा:—

“ The lesson that thy faithful love has taught him
He has heard ;
The wind of spring obeying thee hath brought him
At thy word ;

What joy in all the three worlds was so precious
To thy mind ?
*Ma kooroo manini manamaye,* *
Ah, be kind ! "

असो. आपल्याकडील कोणकोणत्या भाषांत गीतगोविंदाचीं भाषांतरें झालीं आहेत त्याची पूर्ण माहिती अद्याप मला मिळाली नाहीं. बंगाली (कर्ता गिरिधर, स. १७३६), हिंदी (कर्ता रायचंद, स. १७७५), गुजराथी ( प्रो. ध्रुव. १९२४ ) इत्यादि भाषांत गीतगोविंद झालें आहे. बरोबरच आहे. उत्कृष्ट काव्यरत्नास आपापल्या भाषासुवर्णाच्या कोंदणांत बसविण्याचा मोह तरल कविप्रतिभेस न झाला तरच आश्चर्य !

मराठींत गीतगोविंदाचीं निदान चार भाषांतरें प्रसिद्ध झालेलीं आहेत—(१) चेतोहरदेवकृत गीतगोविंद समश्लोकी भाषांतर १८८९ त प्रसिद्ध झालें असून, तें नांवाप्रमाणें श्लोकास समवृत्त श्लोक व अष्टपद्यांस तशाच चालीवर अष्टपद्या अशा धर्तीचें आहे. हें भाषांतर एकंदरींत बरें आहे.‡ (२) 'वसंतविहार'कृत 'गीतगोविंदां'त नुसत्या अष्टपद्यांचें त्याच चालींत भाषांतर केलेलें आहे (१९२४). (३) 'अनन्ततनय'कृत गीतगोविंदांत काव्याचा विस्तृत गद्यांतच अर्थ दिलेला आहे. (४) गीतगोविंदाचा गद्यांत अर्थ कोंकणच्या 'महेश्वर' नामक कोणीं एका गृहस्थानें केला होता; तदनुरोधानें निरनिराळ्या पदांच्या चालींवर तो अर्थ गोवून 'सखाराम' नांवाच्या कवीनें केलेलें पद्य रूपांतर १९२५ त चित्रशाळेनें प्रसिद्ध केलेलें आहे. त्याची रचना बरीच शिथिल व अशुद्ध दिसते. या चारींपैकीं पहिलें आतां दुर्मिळ झालेलें आहे. गीतगोविंदावर संस्कृत टीकाहि अनेक आहेत.§

---

* My proud one ! do not indulge in scorn.

‡ चेतोहरदेव (कै. प्रो. परशुराम नारायण पाटणकर, एम्. ए, स. १८६० ते १९२९ ) यांनीं आपल्या गीतगोविंदसमश्लोकीच्या प्रस्तावनेंत त्यांच्याहि पूर्वी ३०।३५ वर्षें झालेल्या, भावाचार्य अष्टपुत्रेकृत 'भावार्थदीपिका' नामक एका गीतगोविंदसमश्लोकीचाहि उल्लेख केलेला आहे.

§ यांपैकीं प्रसिद्ध संस्कृत टीका अशाः- (१) कुम्भनृपतिकृत 'रसिकप्रिया';

येथें हें विशद करून सांगितलें पाहिजे कीं, गीतगोविंद हें वाङ्मयाच्या कोणत्या सदरांत मोडतें याविषयीं पाश्चात्य पंडितांत ऐकमत्य दिसत नाहीं. जोन्सच्या मतें हें कुणबाऊ अगर गोपजनांचें नाटक ( Pastoral drama ) आहे. लॅसन् म्हणतो कीं, गीतगोविंद हें भावनाट्य अथवा संगीतमय नाटक ( Lyrical drama ) असावें. तर व्हॉन श्रोडर याचा अभिप्राय असा कीं, गीतगोविंद हा एक सुधारलेला यात्राप्रबंध होय. पिशेल व लेव्ही यांनीं मधलाच मार्ग स्वीकारून गीतगोविंदास नाटक व संगीत यांच्या दरम्यानच्या वाङ्मयप्रांतांत स्थान दिलें आहे. पिशेल गीतगोविंदास Melodrama असेंहि नांव देतो. परंतु कीथनें हीं सर्व मतें अयोग्य ठरविलीं असून गीतगोविंदकर्त्यानेंच ग्रंथाची काव्याप्रमाणें सर्गवार विभागणी केली आहे, नाटकाप्रमाणें अंकवार, प्रवेशवार रचना केलेली नाहीं, या प्रमुख मुद्यावर भर देऊन गीतगोविंद हें 'काव्य'च आहे, असें प्रस्थापित केलें आहे. असो. आपण पूर्वीपासून गीतगोविं-

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

(२) महामहोपाध्याय शंकरमिश्रनिर्मित ' रसमञ्जरी ';-या दोन टीका गीतगोविंदाच्या निर्णयसागरी प्रतींत आहेत पुस्तकास श्री. मंगेश रामकृष्ण तेलंग यांनीं प्रस्तावना लिहिली असून, तींत चंद्रदत्तकृत भक्तमालेंतील जयदेवासंबंधींचे अध्याय उद्धृत केले आहेत: कुम्भनृपति व शंकरमिश्र हे दोघेहि टीकाकार रसिक पंडित दिसतात. परंतु दोघेहि विशेषत: पहिला, आत्मप्रौढी करण्यांत कुशल असून आपली टीका उत्तम, सर्वगुणसंपन्न व रसदर्शिनी आहे असें दोघेहि म्हणतात. (३) ' नारायण 'कृत टीका ही व्यंकटेश्वरी प्रतींत आहे. हा टीकाकारदेखील मार्मिक पंडित आहे. यानें आत्मप्रौढीचा चकार शब्द काढलेला नाहीं. मला याच टीकेचा जास्त उपयोग झाला. 'सुश्लोकगोविंद' तयार झाल्यानंतर ९।१० वर्षांनीं निर्णयसागरी प्रत मला पहावयास मिळाली. किंबहुना सुश्लोकगोविंद पूर्ण होईपर्यंत गीतगोविंदावर अन्य कोणती टीका अगर मराठी वा इतर कोणत्याहि भाषेंत त्याचें भाषांतर झालें आहे हीहि माहिती मला नव्हती.

दास 'काव्य'च म्हणत आलों आहोंत, व उपरिनिर्दिष्ट पाश्चात्य विद्वानांप्रमाणें आपल्या विद्वानांत मतभेद अगर संशय असा कधींच उत्पन्न झालेला नाहीं. 'एन्सायक्लोपीडिआ ब्रिटॅनिका'मध्यें 'संस्कृत भाषा' या सदराखालीं लिहिणाऱ्या लेखकद्वयांनीं गीतगोविंद हें 'धार्मिक नाटक' ( Religious drama ) असल्याबद्दल मत प्रकट केलें आहे. *

'सुश्लोकगोविंदा'ची§ रचना करतांना जयदेवाचें वैशिष्ट्य जें शब्दालंकार व अर्थालंकार यांनीं मंडित अशी मधुरकोमल काव्यसरणी, तें यथामति मीं संभाळलें आहे. फक्त गेय चालीवरील रचनेचा अंगीकार मीं अर्थातच केलेला नाहीं. तथापि एकेका अष्टपदीस रसभावानुकूल असें सुवृत्त योजून रसाचा परिपोष व्हावा असा शिकस्तीचा प्रयत्न केला आहे. प्रत्येक प्रबंधाच्या ध्रुवपदाचा प्रायः एक श्लोक बनवून पुढेंहि प्रत्येक कडव्याचा बहुधा एकेक श्लोक बनविला आहे. मुळांतील कांहीं अतिरिक्त शृंगार मराठींत आणतांना मीं थोडा सौम्य केला आहे; व सदभिरुचीस धक्का शक्य तों न लागावा व मूळचें स्वारस्यहि न गमवावें असें ध्येय ठेविलें आहे. मूळच्या गीतगोविंदाचा भावार्थच 'सुश्लोकगोविंदां'त आढळेल. शब्दशः भाषांतर केलेलें नाहीं, व तसा माझा प्रथमच हेतु नव्हता. स्वतःच्या कल्पनेस शक्य तितकें स्वातंत्र्य देऊन हा अनुवाद केलेला आहे. सुश्लोकगोविंदाचा प्रत्येक श्लोक कोणत्या मूळ पदावरून प्रायः रचला आहे एवढेंच जिज्ञासु वाचकास सुलभतेनें समजावें, यासाठीं शेवटीं अन्योन्यसंबंध दाखविणारी सूची दिलेली आहे. अनुरूप शब्दांची, वाक्यांची अगर कल्पनांची भावानुसारी भर मीं पदोपदीं घातली आहे. नुसतें 'सुश्लोकगोविंद'च अथपासून इतिपर्यंत वाचलें तरी वाचकास आपण एक स्वतंत्रप्राय काव्य वाचतों आहोंत असें वाटलें, तर माझा इष्ट हेतु साध्य झाला असें मी म्हणेन. शब्दशः भाषांतर करण्यांतहि कसब आहेच. पण मूळचा गोडवा राखून शब्दशः भाषांतर आणि तेंहि पद्यांत

* Jayadeva s beautiful poem Gitagovinda which, like most productions concerning Krishna, is of a very sensuous character, is a religious drama. —J Eg.; J. Al.

§ गीतगोविंदांतील 'प्रिये चारुशीले' ही अष्टपदी (स.१०) एका जुन्या हस्तलिखितांत मला प्रथमतः १९१६ त आढळली व ती पाठ करण्या-

करणें अत्यंत दुर्घट आहे. कोणत्याहि दीर्घकाव्याचें भाषांतर सुरस वठलें असेल तर तेथें भाषांतरकार कवीनें शब्दशः भाषांतर करण्याचा अट्टाहास धरलेला नाहीं, असेंच आढळून येईल. कमीअधिक मानानें भावार्थग्राही भाषांतर होणें अपरिहार्यच असतें. पण त्यांतहि स्वतःच्या कल्पनेप्रमाणें बुद्ध्याच थोडाबहुत बदल करून भाषांतर करावयाचें म्हटलें म्हणजे हा बदल योग्य कीं अयोग्य याविषयीं प्रश्न उद्भवण्याचा सुतराम् संभव असतो. 'सुश्लोकगोविंदां'त हें साहस अंगीकारलें आहे; आणि तें यशस्वीपणें पार पडलें आहे कीं कसें तें चाणाक्ष रसिकांनीं ठरवावयाचें आहे. कसा फेरफार केला आहे हें दाखविण्यास कोणतेंहि एकच उदाहरण येथें घेतलें तरी पुरें होईल. सर्वांत लहान असा जो ५ व्या सर्गांतला १० वा प्रबंध त्यांतील ध्रुवपद व दुसरें कडवें असें आहे:-

तव विरहे वनमाली सखि सीदति । ध्रु० ।
दहति शिशिरमयूखे मरणमनुकरोति ।
पतति मदनविशिखे विलपति विकलतरोऽति ॥२॥

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू )

साठीं मीं तिची एक प्रत करून घेतली. गीतगोविंदाशीं हाच माझा पहिला परिचय असला तरी तो प्रबंध कोणत्या मूळ काव्यांतला आहे, हें समजण्याची संधि पुष्कळ कालपर्यंत आली नाहीं हें खरें. १९१८ च्या जूनमध्यें मुंबईस ग्रँट मेडिकल कॉलेजांत प्रवेश करण्यासाठीं मी प्रथम पुण्यास आमचे बंधुवर्य कै० ती. दादा यांजकडे आलों; कारण तेहि मजबरोबर मुंबईस त्याच विद्यालयांत पुढील अभ्यासासाठीं येणार होते. त्यांच्या संग्रहींची गीतगोविंद प्रत त्यांनीं मला दाखविली व दिली. त्यांत उपरिनिर्दिष्ट अष्टपदी आढळून मला आनंद झाला. गीतगोविंदाचें मराठी रूपांतर करण्याचा विचार मीं त्याचवेळीं केला व त्याप्रमाणें एका सुटींत प्रथम सर्गाची रचना केली पुढें मधून मधून सवड होईल तसतसें १९२३ पर्यंत सुश्लोकगोविंद पूर्ण करतां आलें. रसिक बंधुवर्यांना तें इतकें आवडलें कीं, ११ व्या सर्गांतील सखीनें राधेस कृष्णाकडे जाण्याची त्वरा करण्याविषयीं सांगितलेलें पंचचामर वृत्तांतील बोल अत्यंत अनुरूप वृत्तांत असल्याचें सांगून त्यांनीं ते तालांत चालत चालत, ठेक्यानें वाचून दाखविले; तो प्रसंग माझ्या मनश्चक्षूपुढें वारंवार येतो!

'सुश्लोकगोविंदां'त याबद्दल खालील श्लोक आढळतील:-

"राधिके! कुसुमकोमल बाळे!। कृष्णमानस-विहारि-मराळे!
पीडिला सुमशरें वनमाळी। थोर त्यासि विरहानल जाळी २
चंद्रिका-किरण सेवुनि शीत। येइ कीं मरण, मन्मन भीत।
त्यासि पाहुनि सये! मज वाटे,। कामिलोक बहुधा उफराटे! ४
कामबाण पडला जर अंगीं,। शूर वीरहि गदाधर शार्ङ्गी।
होत हा विकलकाय, अगाई! धाय धाय रडतो! नवलाई. ५"

प्रस्तुत पद्याचें चेतोहरदेवकृत समवृत्त भाषांतर असें आहे:-

"विरहिं तुझ्या वनमाळी झुरत सखे। ध्रु०
मदनशर उरिं लागे रुदन करित बाई।
दहन करित शशि गे मरण हरिस जणुं येई ॥२॥"

प्रो. ध्रुवरचित गुजराती 'गीतगोविंदां'त हाच भाग पुढें दिल्याप्रमाणें आहे. त्यांनीं अनुसरलेल्या मूळ संस्कृत प्रतींत या कडव्याचें अर्ध निरनिराळ्या कडव्यांत आहेसें वाटतें:-

"तव विरहे रसियाजी अव ए झुरे.। ध्रु०।
कुसुमशराथि फफडे वळि वळि छळि छळि प्राण [ ४ उत्तरार्ध ]
धरणिशरण तलपे स्मरि हिमकरकर मंन [ ५ " ]

एड्विन् आर्नोल्ड या पद्याचें इंग्रजी कवितेंत रूपांतर करतो तें असें:-

"To him the moon's icy chill-silver
Is a sun of midday;
The fever he burns with is deeper
Than starlight can stay:
Like one who falls stricken with arrows,
With the colour departed
From all but his red wounds, so lies
Thy love, bleeding-hearted."

या उताऱ्यांवरून भाषांतरांची व फेरफारांची थोडीफार कल्पना वाचकांस झाल्यावांचून रहाणार नाहीं. असो. गेयतेबद्दल असें म्हणतां येईल कीं, खरे गवई जे असतात ते वृत्तबद्ध रचना देखील संगीतपद्धतीनें उत्तम प्रकारें म्हणतात. संगीतज्ञ हरिदास आख्यानांतील विविध श्लोक, आर्यादि पद्यें म्हणूं लागला म्हणजे किती बहार करतो, तें पुष्कळांनीं अनुभवलेंच असेल. या दृष्टीनें सुश्लोकगोविंदांतील वृत्तांना गेयानुकूलतेचा पाठपुरावा करणें हें म्हणणाऱ्याच्याच कौशल्यावर अवलंबून आहे, असें मला वाटतें. दुसरी गोष्ट अशी कीं, श्लोक हे सामान्यपणें कोणासहि म्हणतां येतात. गेय चालींवरील पद्यें सामान्य जनांस बहुधा नीट वाचतां येणार नाहींत. ‘सुश्लोकगोविंद’ हें अभिधान श्लेषार्थयुक्त असून ‘उत्तम कीर्तीचा गोविंद’ असाहि अर्थ त्यांतून प्रतीत होतो. ‘सुश्लोकगोविंदां’तील श्लोक जर कदाचित् ‘भिन्नरुचिर्हि लोकः’ या न्यायानें उत्तम न वाटतील, तर ‘सुश्लोक’ याचा ‘पुण्यश्लोक’ असा सुप्रसिद्ध अर्थ घेतला म्हणजे झालें ! असो. ‘सुश्लोकगोविंदा’विषयीं अधिक कांहीं लिहावयाची आवश्यकता आहे असें वाटत नाहीं. त्याचा आस्वाद घेणें व सरसनीरसता ठरविणें हें कार्य मी रसिकांवर नम्रपणें सोंपवितों आणि गीतगोविंदांत गाइलेला गोपी व राधा यांचा श्रीकृष्णाशीं विलास आपण कोणत्या सात्त्विक चष्म्यांतून अवलोकन करावा, राधादामोदरांचें प्रेम कसल्या स्वरूपाचें होतें, रासलीला याचा आध्यात्मिक अर्थ काय केला जातो व जावा, श्रीमद्भागवतांतील दशमस्कंधांत वर्णिलेल्या श्रीकृष्ण व गोपिका यांचे प्रेमाविषयीं विद्वानांचीं काय मतें आहेत, इत्यादि गीतगोविंदाच्या अंतरंगाशीं संलग्न असलेल्या, व पुष्कळदा वादविषयीभूत झालेल्या महत्त्वाच्या प्रश्नांकडे मी यथामति वळतों. येथें पूर्वसूरींचीं असंख्य प्रमाणें मांडतां येतील; परंतु स्थलसंकोचास्तव थोडीं निवडक मतेंच विचारांत घेऊन कार्यनिर्वाह करावयाचा आहे.

गीतगोविंदांत वर्णन केलेलें राधेचें कृष्णाविषयीं प्रेम व त्याच्याशीं झालेलें मीलन याच्याकडे कित्येक विचारी लोक आध्यात्मिक दृष्टीनें पाहतात व जीवात्मा हा परमात्म्याशीं संयोग पावून एकरूप होण्यासाठीं किती आर्त झालेला असतो तें दाखविण्यासाठीं कवीनें हें राधाकृष्णांचें

प्रतीक निर्माण केलें आहे, असें ते प्रतिपादन करतात. कित्येक तत्त्वज्ञ असें म्हणतात कीं, श्रीकृष्ण ही अलौकिक विभूति असल्यानें गोपिकांचा खरोखरीच काम पुरवून गोपिकांना निष्काम करणें व त्यांचा उद्धार करणें हेंहि भगवंतांच्या अनेकलीलांपैकींच एक लीलाकृत्य होय. कित्येकांनीं असेंहि म्हटलें आहे कीं, परमेश्वराचें, द्वेषबुद्धीनेंसुद्धां, चिंतन करून प्राणिमात्र तरतो, तर ज्या गोपांगनांनीं जारबुद्धीनें कां होईना, परमेश्वरास स्वात्मार्पण केलें, त्या पुण्यरूपच बनल्या नाहींत काय ? मोठमोठे भगवद्भक्तहि म्हणतात कीं, गोपींचे प्रेमाचा व भक्तीचा एक कोट्यंशसुद्धां इतरांना साधणें दुष्कर होय ! असो. या बाबतींत आधुनिक विद्वदग्रणी भारताचार्य वैद्य हे काय म्हणतात तें आमच्या वाचकांस कळावें म्हणून श्रीमहाभारत उपसंहारांतील त्यांचे एतद्विषयक महत्त्वाचे विचार येथें सविस्तरच देत आहें:—

‘ श्रीकृष्णानें गोपीशीं अश्लाघ्य वर्तन केलें हा आरोप श्रीकृष्णाच्या काळीं नव्हता; श्रीकृष्णावर गोपी जें प्रेम करीत होत्या, तें निर्व्याज, विषयातीत ईशभावनेनें करीत होत्या अशीच कल्पना महाभारतांत दिसते. आणि महाभारतास हल्लींचें स्वरूप इ. स. पूर्व २५० च्या सुमारास मिळालें त्यावेळेपावेतों अशीच कल्पना होती. द्रौपदीनें वस्त्रहरणाचे वेळीं धांवा केला त्यांत तिनें त्यास ‘ गोपीजनप्रिय ’ या विशेषणानें संबोधिलें आहे. या विशेषणांत दीन अबलांचा कैवारी तो आहे एवढाच अभिप्राय आहे हें उघड आहे. त्यांत निंद्य संबंध अभिप्रेत असता तर सती द्रौपदीस तिच्या पातिव्रत्याच्या परीक्षेचे प्रसंगीं तो आठवताना, आठवता तर ती उच्चारतीना, आणि उच्चारती तर तो तिच्या कामास येताना. तात्पर्य, या विशेषणांत गोपींचें विषयातीत भगवत्प्रेमच गर्भित आहे हें निर्विवाद आहे. दुसरें, शिशुपालानें राजसूययज्ञांतील अर्घ्यहरणाच्या प्रसंगीं श्रीकृष्णाची मनसोक्त निंदा केली. पण त्यांत हा आक्षेप त्यानें घेतला नाहीं. तिसरें, श्रीकृष्ण लहानपणापासूनच मल्लविद्येचा चाहता होतां हें प्रसिद्धच आहे. कंसानें त्यास कुस्ती खेळण्याकरितां मथुरेस बोलाविलें होतें. असा बालमल्ल कधींहि कामाच्या नादीं लागत नाहीं हा सिद्धान्त होय. ईश्वराच्या कल्पनेनें वाटेल तें संभवेल, पण श्रीकृष्णानें आपल्या अवतारांत

मानवी कृत्येंच करून दाखविलीं आहेत. ईश्वरी सामर्थ्य उपयोगांत आणलें नाहीं, आणि कोठें आणलें असलें तरी असल्या निंद्य कृत्यांत तर खचित आणलें नसावें, सारांश सर्व दृष्टींनीं विचार करतां हा आरोप खरा नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. गोपी श्रीकृष्णावर केवळ निर्विषय प्रेम करणाऱ्या परमभक्त होत्या अशीच समजूत हल्लींच्या महाभारतापर्यंत होती. पण हळुहळू भक्तिमार्गात भक्तीची मीमांसा होत गेली, तेव्हां भक्तीस असतीच्या जारावरील प्रेमाची उपमा घेऊं लागले असावे आणि, 'यथा स्त्रीणां तथा वाचां साधुत्वे दुर्जनो जनः ।' या भवभूतीच्या उक्तीप्रमाणें स्त्रियांविषयीं नेहमीं गैरसमज जगतांत उत्पन्न होत असल्यानें ही कल्पना रूढ झाली असावी. श्रीकृष्णाच्या प्रवृत्तीला अनकूल असलेल्या मतामुळें या प्रवादास पुष्टि मिळाली असावी, आणि रासांच्या वर्णनानें त्यास पालवी फुटली असावी. याप्रमाणें हा प्रवाद मागाहून उत्पन्न होऊन तो कालगतीनें इतका वाढला कीं इ.स.च्या९व्या शतकांत प्रसिद्धि पावलेल्या भागवतास तो टाकतां येईना. या अद्वितीय वेदान्तपर ग्रंथानें त्यास आपल्या रम्य कवित्वानें एके परी अजरामर केलें तर दुसरे परी त्यास वेदान्तांत गुरफटून इतकें पवित्र केलें कीं, श्रीकृष्णाच्या व गोपींच्या लीलांचीं हजारों गीतें आम्ही ऐकतों पण आमच्या मनांत निंद्य भावनेचा एक लेशही उत्पन्न होत नाहीं. भागवतानें या प्रवादास थारा देऊन पवित्र केल्यावर शृंगारप्रिय कवींनीं, विशेषतः जयदेवानें गीतगोविंदांत व इतर कवींनी व्रजभाषेंतील हजारों सुंदर पद्यांत, त्यास चोहोंकडे फैलावून लोकप्रिय केलें यांत नवल काय ? किंबहुना यामुळें शृंगारांत प्राकृतांत एक प्रशस्त मर्यादा उत्पन्न झालेली दिसते. शृंगार गावयाचा तर तो गोपीकृष्णांचा, असा एक प्रशस्त कविसंप्रदाय हल्लीं दिसून येतो. असो. या आक्षेपाचें निंद्यत्व याप्रमाणें जरी भागवतानें काढून टाकलें आहे, तरी ऐतिहासिकदृष्ट्या त्याच्या सत्यतेचा विचार करणें जरूर पडलें आणि असा विचार करतां हा प्रवाद निराधार आहे असेंच म्हणावें लागेल."

प्रो. परांजपेकृत केकावलीटीकेंत कृष्णावरील आक्षेपकांचा चांगलाच परामर्ष घेतला आहे, व त्यांत राधाकृष्णांच्या प्रेमभक्तींचें रहस्य अनेक

ग्रंथाधारें उत्तमपणें प्रकट केलें आहे. पुढील कांहीं उतारे त्यांतूनच मूळच्या इंग्रजीचें मराठी भाषांतर करून येथें देण्यांत येत आहेत. धीरेन्द्रनाथ पाल आपल्या 'Shri Krishna, His Life and Teachings' ('श्रीकृष्ण, त्याचें चरित्र व शिकवण') या ग्रंथांत म्हणतातः—

"येथें कोणी अशी शंका घेईल कीं, पुराणांसारखे पवित्र ग्रंथ व जयदेवकवीच्या गीतगोविंदासारखीं महान् काव्यें यांमध्यें कृष्णदेवतेचें वैषयिक शृंगारपर प्रेमकथन कां बरें करण्यांत आलें असावें? त्या महर्षींच्या व कवींच्या हेतूंचें पूर्णपणें आकलन होणें आम्हांस दुरापास्त आहे, हें तर खरेंच. पण असें वाटतें कीं, मनुष्याच्या अंतर्यामीं परमेश्वराविषयीं किती गाढ भक्ति असावी, याविषयीं दृष्टांतादाखल म्हणून त्यांनीं सर्व विश्वांत अत्यंत विपुलतेनें आढळणाऱ्या मानवी कामुक प्रेमाचा दाखला दिलेला असावा......असंख्य कवींनीं आपली प्रतिभाशक्ति राधेचें यथार्थ वर्णन करण्यांत खर्च केली आहे. तिचें कृष्णाविषयींचें प्रेम हें जीवात्म्याचें परमात्म्याशीं असलेलेंच आत्यंतिक प्रेम दर्शवितें. राधा म्हणजे परमेश्वराविषयींच्या भक्तीची केवळ परमोदात्त मूर्ति होय. परंतु अनेक कुकवींच्या हातांत राधा सांपडल्यानें तिला त्यांनीं कामुकतेची पुतळी बनविली आहे, हेंहि नाकबूल करतां येणार नाहीं!"

एन्सायूक्लोपीडिआ ब्रिटॅनिका (११ वी आवृत्ति) मध्यें 'Hindism' या सदरांत डॉ. एच्. ज्यूलिअस एग्लिंग, पीएच्. डी. यांनीं काढलेल्या उद्गारांचा आशय असा—"रामानुज व निम्बार्क यांच्या तत्त्वज्ञानानुसार विचार करतां, जयदेवानें वर्णन केलेली श्रीकृष्ण व राधा यांची वैषयिक प्रीति ही गूढ आध्यात्मिक अर्थानें उकलावयाची असून अशा वर्णनांचा उद्देश हाच कीं, मनुष्याचा आत्मा प्रीतिमार्गानें परमात्म्याशीं मीलन पावण्यास कसा पराकाष्ठेचा यत्न करीत असतो, व अनेक अडचणींतून पार पडून इच्छित ध्येय कसें संपादन करतो, तें रूपकानें दाखवावें." 'थिऑसाफिस्ट'च्या नोव्हेंबर १८८६ च्या अंकांत 'सप्तभूमिका' नामक लेखांत श्री. श्रीनिवास राव म्हणतात—"बायबलूचे सुविख्यात टीकाकार अडॅम क्लार्क यांचा गीतगोविंद काव्याविषयीं असा

अभिप्राय आहे. ‘ हें काव्य खरोखरच अद्वितीय व आश्चर्यकारक असून माझ्या मतें कोणीहि निःपक्षपाती चिकित्सक असाच निवाडा देईल कीं, प्राचीन अगर अर्वाचीन कवींच्या या कोटींतील कोणत्याहि काव्यापेक्षां जयदेवाचें गीतगोविंद हें काव्य कदाचित् अधिक सरस नसलें तरी त्याच्या तोडीचें निदान खास होईल.’ बाह्यतः गीतगोविंद हें एक गोपकथानक ( Pastoral song ) असून, दोन प्रेमी जीवांचें प्रेम व मीलन हींच त्यांत गाइलीं असलीं तरी, अनेक पौरस्त्य व पाश्चात्य तज्ञांच्याहि मतें त्याचा अर्थ, अडॅम क्लार्क यांनीं म्हटल्याप्रमाणें ‘ निःसंशय आध्यात्मिक’च ( Confessedly mystical ) आहे; व त्यांत भक्ताच्या अंतरात्म्याची आपल्या दैवताशीं पवित्र व शुद्ध भावनेनें रममाण होण्याविषयींची उत्कंठा प्रकट झालेली आहे. बायबल्मधील ( Song of Soloman ) ‘ सॉल्मेमनचें गीत ’, यावर टीका लिहितांना अडॅम क्लार्कनीं गीतगोविंदांतील अनेक उताऱ्यांशीं त्याचें कसें तंतोतंत साम्य आहे, तें मार्मिकपणें विशद केलें आहे. गीतगोविंदकारानें सर्ग १ श्लो. ३ [ यदि हरिस्मरणे सरसं मनो यदि विलासकलासु कुतूहलम् । मधुरकोमलकान्तपदावलिं शृणु तदा जयदेवसरस्वतीम् ॥ ] यांत जें सांगितलें आहे त्याचा इत्यर्थ हाच कीं, गीतगोविंदांत वैषयिक वासनांचा अंतर्भाव, तशाहि मनुष्याची तिकडे प्रवृत्ति व्हावी म्हणून, केवळ प्रलोभनाप्रमाणें केला असला तरी, त्यांत पूर्णपणें आध्यात्मिकच शिक्षण असून हळूहळू विषयत्यागानें शुद्ध पवित्र अशा परमेश्वराकडे मनाचा ओढा साकल्यानें वहावा अशीच योजना केलेली आहे.” ‘ श्रीकृष्ण ’ या पुस्तकांत श्री. डी. के. विश्वास लिहितात– “ श्रीकृष्णांनीं आपल्या अवघ्या एकाच अवतारचारित्र्यांत आदर्श शिशु, आदर्श कुमार, आदर्श युवा, आदर्श भर्ता, आदर्श संसारी पुरुष, आदर्श राजनीतिवेत्ता, आदर्श भूपति, आदर्श तत्त्वज्ञ आणि आदर्श उद्धारक कसा असतो तें स्वतःच्या सर्वांगपरिपूर्ण अवतारानें सिद्ध केलें आहे, हें आपण पाहतोंच. ” ‘ श्रीकृष्णाचें अनुकरण ’ ( Imitation of Shri Krishna ) या एस्. सी. मुखोपाध्याय यांच्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे–“ ‘ नैतिक ’ हा सापेक्ष शब्द आहे, आणि परमेश्वरास तो लावूं पाहणें म्हणजे तर वेडेपणाचा

कळसच होय. धर्म्य व अधर्म्य हे लोहचुंबकाच्या धन व ऋण टोंकां-प्रमाणें असून परमेश्वर हा निर्विकार मध्य होय. अविशुद्ध मलिन अंतःकरणाच्या व्यक्तीस वेदान्ताचीं तत्त्वें कळणें जसें अशक्य, तसेंच श्रीकृष्णाच्या निर्गुणत्वाचेंहि ज्ञान होणें असंभाव्य होय. आमच्या मतें गुण व दोष हे शब्द परस्परसापेक्ष असल्यानें परमात्म्यास ते लावतां येणार नाहींत. जी व्यक्ति गुणांनीं तशीच दोषांनींहि सारखीच भरलेली आहे, तीच व्यक्ति आमच्या मतें नुसत्या अत्यंत गुणी व्यक्ती-पेक्षां अधिक मोलाची. कोणत्याहि परिस्थितींत मनाचा समतोल-पणा न ढळूं देणारी व्यक्तिच साऱ्या विश्वांत श्रेष्ठ होय. संगवि-वर्जित कर्में करणाऱ्यास कर्मबंधाचा कायदा लागू पडत नाहीं, हेंच तत्त्व व्यवहारांत शिकविण्यासाठीं कृष्ण अवतरले; व हेंच तत्त्व शिकविण्यासाठीं गुण व दोष यांस त्यांनीं समान लेखून दाखविलें. भगवद्गीतेच्या प्रत्येक श्लोकांत हेंच तत्त्व ठसविलें आहे; आणि श्रीकृष्णाचें मायावी चरित्र म्हणजे याच तत्त्वाचें मूर्तिमंत उदाहरण होय. "

हीं झालीं आधुनिक पंडितांचीं मतें. आतां, परमेश्वराच्या अगाध लीलांचें आपणांस पूर्णपणें आकलन होणें अशक्य आहे असें म्हणणारे जे प्राचीन साधुसंत व वामनमोरोपंतादि भगवद्भक्त, कविश्रेष्ठ तेहि भक्ति-भावानें कृष्णगोपींचें विलासवर्णन, रासलीला इत्यादि गाऊन आपली वाणी धन्य झाली असे कृतार्थतेचे उद्गार काढतात.मोरोपंतांनीं 'श्रीराधा-नामावली' नामक एक अत्यंत सुरस संस्कृत काव्यप्रकरण लिहिलें असून त्यांतील राधेचें वर्णन गीतगोविंदांत आलेल्या अनेक वर्णनांशीं पुष्कळ जुळतें आहे, हें त्यांतील ज्या थोड्या त्रुटित पंक्ति येथें देत आहें त्यांवरून कळून येईल. रसिकांचें लक्ष त्याकडे जावें तितकें गेलेलें दिसत नाहीं—

श्रीकृष्णदायिता श्रीड्या श्रीकण्ठस्तुतसद्गुणा
राधा महासती मान्या पुण्यकीर्तिसुधासरित्
व्यासादिसत्कविस्तव्या शुकयोगीन्द्रवर्णिता
कृष्णदर्शनसर्वस्वा कृष्णसर्वस्वदर्शना

पुराणपुरुषप्रीता परब्रह्मप्रसादिनी
कलिंदजाप्रियसखी कलिकल्मषनाशिनी
महाविदग्धा कालिन्दीतीरकुञ्जविहारिणी
कलावती रासरक्ता रम्याकृतिरुदारधी:
गोविन्दाङ्कासनासीना गोविन्दाश्लेषनिर्वृता
वेणुनादहृतस्वान्ता कान्तकान्ति: कलध्वनिः
कर्णपूरीकृतप्रेष्ठप्रेमार्पितशिखिच्छदा
धीराभिसारिका नैकयुक्तवेषा प्रियंवदा
सुराङ्गनागीतकेलिर्गुणाढ्या गुणिसंगता
गन्धर्वगीतचरिता मेनकाद्यप्सरस्स्तुता
उर्वशीकृतसत्कारा घृताचीराचिताञ्जलिः
रम्भासंवीजितापादपद्मप्रह्वा तिलोत्तमा
गोपीश्वरी गोपलक्ष्मीर्गोमती गोकुलोद्भवा
कृष्णचेतोहरा कृष्णसहगानधुरंधरा
कृष्णस्कन्धार्पितभुजा कृष्णास्यनिहितेक्षणा
कृष्णाननात्तताम्बूला कृष्णाश्लेषनिमीलिता
कृष्णस्तुता कृष्णहृता कृष्णचित्तप्रमाथिनी
कृष्णानुकारकुशला कृष्णप्राणेश्वरीश्वरी
रत्युत्तमा रतीशाक्षी रसश्रेष्ठैकमानसा
तमिस्रदीपिकाकान्तिस्तारुण्यामृतनिम्नगा
कृष्णप्रसाधिता कृष्णहस्तलब्धविशेषका
स्तनभारनमन्मध्या नखदन्तक्षताञ्चिता
प्रेमक्रीताच्युता प्राज्यप्रीतपीताम्बरप्रभुः
पक्ष्मलाक्षी पद्मपत्रव्यजनानिलसेविनी
पुरुषायितसंप्रीतप्रियाकृष्टमनोघना
उद्दामरूपसंपत्तिरुल्लसन्मणिमेखला
हेलानिर्जितदिव्यस्त्री हेमतालफलस्तनी
कृष्णहृत्पञ्जरशुकी कृष्णमेघशतह्रदा
कृष्णचेतोऽङ्गणनटी कृष्णसत्तरुसल्लता

कृष्णलोचनकर्पूरशलाकायितविग्रहा
श्रीकृष्णशशभृज्ज्योत्स्ना श्रीकृष्णद्युमणिद्युति:
श्रीकृष्णब्रह्मसावित्री श्रीकृष्णेश्वरपार्वती
श्रीकृष्णाब्धिमहासिन्धु: श्रीकृष्णाम्नायसत्क्रिया।
श्रीकृष्णाहिमभृन्मेना श्रीकृष्णैरावणाभ्रमु:
श्रीकृष्णदेवेन्द्रशची कृष्णश्रीरामजानकी
श्रीकृष्णशूरासिलता श्रीकृष्णब्राह्मणश्रुति:
कृष्णहृच्चातकप्रावृट् कृष्णबर्ह्यभ्रमालिका
गोविन्दचक्षुस्तृषितचकोरस्मितचन्द्रिका
शृंगारसिन्धुलहरी शृङ्गारारण्यसिंहिका
शृङ्गारेन्दुशरद्राका शृङ्गाराभ्युदयोद्भवा
जारत्वहरजारत्वा जगत्पावनपावनी
सर्वभावविभावानुभावसात्त्विकभावभू:
अशिक्षितातिचातुर्या वञ्चनाञ्चितलोचना
दामोदरोर:शयना कृष्णबाहूपधानका
कृष्णोत्तरीयव्यजना कृष्णाङ्घ्रिनखदर्पणा
नेत्राधरप्रभागुञ्जीभूतनासाग्रमौक्तिका
वंशीनिनादश्रवणक्षणत्यक्ताशनालया
मुरलीनादजीवातुर्मुरलीध्वनिनिस्त्रपा
सायंवेणुरवप्रीता प्रातर्वेणुरवाकुला
कृष्णचुम्बितवंशीर्ष्या वंशीकुत्साकृतादरा
वंशीसपत्नी वंश्याप्तमहाभाग्योत्सवासहा
वंश्यायत्तप्रियप्राप्तिर्वंशीदूतीप्रबोधिता।
वंशीनादनिरस्ताधिर्वंशीलज्जासरित्तरि:
वनमालिपरिष्वंगाऽज्ञातनिर्गतयामिनी
भगवद्विरहाऽशीतरश्मीभूतसुधाकरा
श्रीमत्समागमानन्दचन्द्रीभूतदिवाकरा
निकुञ्जबन्धु:सर्वाङ्गमञ्जुला वञ्जुलालया
कीरनासा चक्रवाकस्तनी खञ्जनलोचना

दामोदरकरस्पर्शश्लथनीविः स्खलद्धतिः
भक्तप्रेमद्रवच्चित्ता भगवद्भक्तिजीवना
भगवत्कौस्तुभादर्शा गोविन्दाधरकज्जला
चुम्बनोत्कप्रियस्पृष्टचिबुका चपलेक्षणा
कृष्णमार्जितरत्यन्तघर्मबिन्दुभृदानना
कृष्णार्पितस्वङ्गरागा कृष्णबद्धस्रगम्बरा
प्रसादकश्रेष्ठदत्तरसाज्ञापारितोषिका
वाङ्मूकीकृतगर्वाढ्यशारदाशुकसारिका
पुनरञ्जनसंप्रीतयशोदाविहितादरा
कृष्णार्पितस्वनेपथ्या कृष्णनेपथ्यधारिणी

– **मोरोपंतकृत समग्र ग्रंथ, भाग ९**
**श्रीराधानामावलीचे वेंचे**

अस्तु. प्रदीर्घत्वाचा आरोप पतकरूनहि हा उतारा इतका विस्तृत देण्याचें कारण हेंच कीं, पंतांनीं काढलेलें हें राधिकेचें शब्दचित्र अतिशय काव्यमय व हृदयंगम वठलें आहे; व त्यावरून राधेची व तिच्या कृष्णविषयक प्रेमाची वाचकास पूर्ण कल्पना येते. गीतगोविंदांतील वर्णनाशीं कांहीं अंशीं तरी सदृश आढळणारीं जीं नांवें या नामावलींत आहेत त्यांचीं प्रथमाक्षरें ठळक जाड्या अक्षरांत दाखविलीं आहेत. त्यांवरून पंतांचा गीतगोविंदाशीं चांगलाच परिचय असावा असें वाटूं लागतें. वामनपंडितांच्या रासक्रीडेंत, श्रीकृष्णाच्या आचरणाचें अनुकरण करूं पाहणाऱ्याविषयी मूढास पंडितांनीं रोखठोक सवाल केला आहे, ते श्लोक फारच वाचनीय असून त्यांत रासलीलेचा आध्यात्मिक अर्थ काय घ्यावा व दुराचरणाकडे कां प्रवृत्ति होऊं देऊं नये तें मोठ्या मार्मिकपणें सांगितलें आहेः—

" गांठी कुंचुकिच्या जगद्गुरुकरें गोपींचिया सूटल्या,
ग्रंथी चिज्जड ज्या अनादि रचिल्या त्याही अहो तूटल्या
कृष्णाच्या अधरामृतें अमरता तत्काळ त्या पावल्या
नीवीमोक्ष मुकुन्दहस्तकमळें तो मोक्ष त्या लाधल्या १७३

कामी लोक तयांसही निजकथा प्रीतिप्रद श्रीहरी
विश्वोद्धारनिमित्त गोपललनाक्रीडा विचित्रा करी
ऐसें आपणही करूं म्हणवुनी जो कां अपेक्षा धरी
थोडेंसें विष तो गळां न मिरवी कां हो ! शिवाचे परी ? १७८
गोपींतें रतिलाभ देउनि सदा जो उर्ध्वरेता हरी
तेव्हां तत्पति मानिती निजभुजीं आलिंगिल्या सुंदरी
जो लक्ष्मीपति नित्ययुक्त करिती जे मूढ त्याची सरी
ते तोंडें वणवा पिऊं न म्हणती, कां हो तयाचे परी? १७९"

—वामनपंडित, रासक्रीडा

शेवटीं एका महत्त्वाच्या मुद्याचा विचार करून समारोप करूं.

एकादी काव्यकृति अगर ललितकलाकृति अति लहान असूनहि चिरंतन कीर्तीची व्हावी यांतील बीज काय? केवळ अवाढव्य आकार हाच कांहीं चिरंजीवित्वाचें कारण नव्हे ! एका आधुनिक पाश्चात्य ग्रंथ-कारानें यासंबंधीं असें मत प्रगट केलें आहे कीं, उत्तमत्व येण्यास ललितकृतींत दोन गुणांची आवश्यकता असते–एक, रचनेंतील सुसंवा-दित्व अगर सुसंबद्धपणा (Harmony) व दुसरा गुण, साधेपणा अगर निर्व्याजता (Simplicity) ' Harmony and simplicity are essential in a work of art. ' असें तो म्हणतो. Simplicity चा अभिप्रेत अर्थहि त्यानें सांगितला आहेः– ' Simplicity is profounder and more spiritual arising spontaneously from the beauty of the subject and the equilibrium of the artist's faculties, not simplicity of plot or regularity of design. ' साधेपणा अगर निर्व्याजता म्हणजे, संविधानक साधें असणें अथवा रचनेंत विशिष्ट नियमबद्धता असणें, असें नव्हे; साधेपणांत याहूनहि गहन व जिव्हाळयाचा अर्थ भर-लेला आहे; आणि तो विषयाच्या सौंदर्यापासून व स्वतः कवीच्या समतोल गुणसमुच्चयापासूनच उत्पन्न व्हावा लागतो. तो ग्रंथकार पुढें म्हणतो कीं, अवाढव्य लेखनाचा हव्यास हें बहुधा बालिशतेचें द्योतक असून आपली प्रचंड (?) लेखनशक्ति दाखवावी, एवढाच त्यांत लेखकाचा

हेतु दिसतो. पण त्या लेखकास हें समजत नाहीं कीं, एकादेंच कां होईना, पण उत्तम संविधानक घेऊन त्यावरच आपलें शक्तिसर्वस्व वेंचणें व संविधानकाच्या आहारीं आपण न जातां, आपणच तें वाटेल तसें वळविणें, हाच आपली प्रतिभाशक्ति दाखविण्याचा खरा मार्ग होय. [ " The immoderate desire to write a great deal is often significant of a puerile wish to make a show of strength & power, without undersranding that the true way to exhibit strength is to take a firm hold of the plot and rule it, whilst keeping oneself completely in hand, and under control. " ] या मार्मिक ग्रंथकाराचें असें स्पष्ट सांगणें आहे कीं, उत्कृष्ट व चिरंतन ललितकृति ही शक्य तितकी लहान व आटोपशीर असायला पाहिजे. [ A permanent work of art should try to be short and brief as far as possible.]

या दृष्टीनें पाहतां जयदेवाची ही काव्यकृति उत्कृष्ट व चिरंतन कां झाली असावी याचा कांहींसा उलगडा होईल. वरील लेखकाच्या मताप्रमाणेंच गीतगोविंदाचें संविधानकहि सुसंबद्ध व साधें आहे. विषयनितान्त सुंदर आहे; व कवीचा गुणसमुच्चयहि अव्याजमनोहर आहे. खूपसें कांहीं तरी लिहावें अशी प्रवृत्ति जयदेवानें गीतगोविंदांत प्रकट केलेली नाहीं. जयदेव संविधानकाच्या आहारीं गेलेला नसून, संविधानकच त्यानें उत्तमपणें पेललें आहे. सारांश हा कीं, आधुनिक पाश्चात्य ग्रंथकारानें घालून दिलेल्या मर्यादा जयदेवासारख्या प्राचीन पौरस्त्य कवीनें कशा तंतोतंत संभाळल्या आहेत, हें पाहिलें म्हणजे एक प्रकारचा अचंबा वाटतो यांत संशय नाहीं. असो.

प्रस्तुत पुस्तकास शेवटीं ( पृ. १०९ ) ' सुश्लोकगोविंदां'तील ठळक अलंकारांची सूची जोडली असून तिचा उपयोग जिज्ञासु रसिकास होईल अशी आशा आहे. ' इयमधिकमनोज्ञा वल्कलेनापि तन्वी ' या न्यायानें स्वभावसुंदर कवितादेवी अनलंकृत देखील शोभूं शकते. परंतु योग्य अलंकार जर तिनें धारण केलें तर त्यांत अनुचित असें कांहींच नसून, उलट ते सौंदर्यवर्धकच ठरतात. अलंकारांच्या कांहीं नांवांबद्दल

तज्ज्ञांमध्यें मतभेद होण्याचा मात्र संभव आहे. कारण 'हृदि बिस-लताहारो नायं भुजंगमनायक: । कुवलयदलश्रेणी कण्ठे न सा गरलद्युतिः ॥ मलयजरजो नेदं भस्म प्रियारहिते मयि । प्रहर न हरभ्रान्त्याऽनङ्ग क्रुधा किमु धावसि' ॥ (३-३) हा श्लोक 'साहित्यदर्पण'कार विश्वनाथानें 'निश्चय' अलंकाराचें उदाहरण ठरविला आहे. कोणी यास अपह्नुति म्हणतात, तर कोणी भ्रान्तापह्नुति म्हणतात. आधुनिक साहित्यशास्त्रज्ञ प्रो. काणे, एल्एल्. एम्. यांच्या मतें हा 'भ्रांतिमान्' अंलकार होय. अशीं संशयस्थळें आणखींहि असूं शकतील. तथापि ही सूची सामान्यपणें उपयुक्त होईल असा भरंवसा वाटतो. ही सूची तयार करण्याचे कामीं माझे विद्वान् मित्र श्रीयुत ग. श्री. हुपरीकर एम्. ए. [ कवि–विरागी ] व माझी गुणशालिनी पुतणी चि. कुमारी कृष्णाताई श्रीखंडे हुजुरबाजार, यांचें फारच साहाय्य झालें आहे. किंबहुना 'सुश्लोकगोविंदा'स त्यांनीं हें एक अलंकारलेणेंच चढविलें आहे असें म्हटलें तर वस्तुस्थितीची अपह्नुति वा अतिशयोक्ति नसून ती एक स्वभावोक्ति अगर सत्योक्तिच होईल !

प्रस्तुत 'सुश्लोकगोविंदां'त राधाकृष्णांचीं चार व अभिसारिकेचें एक अशीं जीं पांच सुन्दर चित्रें घातलीं आहेत, त्यांविषयीं स्वतंत्रपणें दोन शब्द लिहिणें जरूर आहे. हीं चित्रें, श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि बी. ए., अधिपति सं. औंध, यांच्या बहुमोल चित्रसंग्रहालयांत १९३२ च्या डिसेंबरांत श्रीमंतांच्या कृपेनें मला पहावयास लाभलीं व सुश्लोक-गोविंदांतील विषयास तीं सर्वस्वीं अनुकूल होतील असें वाटून मीं त्यां-बद्दल श्रीमंतांकडे मागणी केली. तेव्हां 'सुश्लोकगोविंदा'चें हस्तलिखित श्रीमंतांनीं अवलोकन केलें व तें पसंत पडतांच, सदर पुस्तकांत घालावया-साठीं श्रीमंतांनीं हीं चित्रें स्वतःच्या छापखान्यांत कुशलतेनें छापवून तत्काळ देवविलीं, ही गोष्ट श्रीमंतांची गुणज्ञता, रसिकता व औदार्य इत्यादि गुणगौरवास साजेसीच झाली असली तरी हे मजवर थोर उप-कार होत; व यांतून उतराई होणें मला केवळ अशक्य होय. श्रीमंतांच्या विषयींची कृतज्ञता अभिव्यक्त करण्यास मजजवळ पुरेशी शब्दसंपत्तिहि नाहीं. म्हणून त्यांचे चरणीं नम्र अभिवादन करूनच मी या रम्य चित्रांच्या अल्प कलेतिहासाकडे वळतों. (जास्त माहितीसाठीं श्रीमंतांचा लेख पहा.)

हीं चित्रें कांग्राव्हॅली-चित्रपद्धतीचे उत्कृष्ट नमुने होत. ज्ञानकोशांत या चित्रकलेसंबंधीं माहिती मिळते तिचा आशय असाः—कांग्राकलमाची चित्रकला कटोचे राजा संसारचंद हा गादीवर असतांना म्हणजे १८ व्या शतकाच्या उत्तरार्धात वैभवाच्या शिखराला जाऊन पोंहोचली होती. नाजुक रेषा, चकचकित रंग व सुबक नकशीकाम हे या चित्रकलेचे प्रमुख गुण होत. प्रतिमेच्या बाबतींत ही कला थोडी गौण मानतात. ही राजेरजवाड्यांचीं चित्रें काढी व पुराणांतील गोष्टींचा चित्ररूपानें उठाव करून देत असे. रणजितसिंग राजानें या चित्रकलेस चांगला आश्रय दिला होता; १९ व्या शतकाच्या शेवटीं शेवटीं या चित्रकलेला उतरती कळा लागली. तथापि ती १९०५ (ता. ४ एप्रिल) पर्यंत कसाबसा टिकाव धरून होती. ता. ४ एप्रिल १९०५ रोजीं कांग्राशहर 'धर्मशाळा, नांवाच्या भूकंपाच्या धक्कयानें रसातळाला गेल्यामुळें ही कला कायमची नष्ट झाली!

ह्या चित्रकलेंत प्रकाश व छाया उत्तम प्रकारें साधलेल्या असतात. सर्व 'रागमाला' या चित्रपद्धतींत काढलेली आहे व हीच या चित्रपद्धतीची आश्चर्यकारक व महत्त्वाची कामगिरी होय. संगीतकला व चित्रकला या दोहोंचा उत्कृष्ट मिलाफ कांग्राकलमांतच दिसतो. उत्कृष्ट प्रणयचित्रेंहि याच पद्धतींत आढळतात. चित्रगत व्यक्तींचे अवयवादि प्रायः प्रमाणबद्ध असून भावदिग्दर्शन तर अप्रतिम असतें. कांग्रा चित्रकला ही रजपुत चित्रकलेपासून उत्पन्न झाली आहे.*

---

* रजपुत कलेसंबंधीं एन्सायक्लोपीडिआ ब्रिटॅनिकामध्यें पुढील मजकूर आहे:-

"The themes of Rajput paintings are religious ( of Krishna etc. ). The Krishna cycle and themes, illustrating treatises of rhetoric ( classification of heroines and emotional analysis ) given a contemporary environment in court and village life, permit an exquisite delineation of every phase of love.

In some respects the most exquisite and certainly the most refined, if not the most powerful phase of Rajput painting is that of the Kangra school......... The off-shoots of this school are the Tehri, Garhwal and Shikh portratures.........

The finest collection is in Boston, others in Lahore, and British Museums and private collections."

शेवटीं ही प्रस्तावना हातावेगळी करण्यापूर्वी मला मनोभावें साहाय्य करणाऱ्या अनेक व्यक्तींचें स्मरण झाल्यावांचून रहात नाहीं. प्रथमतः

' काव्यं व्यथाजाड्यमलापहारि हृद्यं मनश्चेतननन्दकारि ।
वाग्भूषणं कीर्तिकरं दुरापं तस्माद्धि ते साधुरयं प्रयत्नः ॥ '

या प्रेमगर्भ मार्मिक शब्दांनीं १९१५ सालींच माझ्या संस्कृत श्लोकबद्ध पत्रास काव्यमय उत्तर देतांना प्रोत्साहनपर उद्गार काढणारे माझे कै. प्रिय बंधुवर्य ती. दादा (डॉ. शंकरराव) यांच्या रसिक मार्गदर्शकत्वानें मला काव्यप्राङ्गणांत अनंत प्रकारें उपकृत केलें आहे. बंधुवर्यांच्या स्मारकासाठीं दीड वर्षामागें मीं ' वाङ्मय-श्री-खण्ड ' संपादून प्रकाशित केलें. त्यांतच काव्यविभागांत ' सुश्लोकगोविंदा'चाहि अंतर्भाव करण्याचा एकदा विचार केला होता. परंतु शृंगाररसप्रधान ग्रंथास स्वतंत्रच प्रकाशन द्यावें असा फेरविचार केल्यानें हें कार्य इतकें लांबणीवर पडलें. आमचे परमपूज्य भगवद्भक्त वडील कै. ती. बाबा (चिंतामण शंकर श्रीखंडे) हे नुकतेच म्हणजे ता. १७ फेब्रुआरी १९३४ रोजीं वयाच्या ८२व्या वर्षी कैलासवासी झाल्यानें, त्यांच्या देखत शक्य तितकें करून हें ग्रंथकार्य पुरें व्हावें हा जो माझ्या अंतर्यामींचा हेतु तो तडीस गेला नाहीं. तथापि त्यांच्या आशीर्वादबलानें मला कृतार्थता वाटते. प्रस्तावनेखेरीज सुश्लोकगोविंदाची एक छापलेली प्रत त्यांस त्यांच्या निर्याणादिवशीं सकाळीं मी नमस्कृतिपुरःसर सद्गदित अंतःकरणानें समर्पिली; व वडिलांनींहि प्रसन्नपणें ती स्वीकारून मजवर थोर अनुग्रहच केला. कै. बाबांनीं सुश्लोकगोविंदाचा प्रथम सर्ग पहिल्यांदा जेव्हां तयार झाला तेव्हांच (१९२०चे सुमारास) वाचून पाहिला होता. कांहीं झालें तरी, आजच्या पूर्ण स्थितींत सुश्लोकगोविंद पाहण्यास ती. दादा व बाबा दोघेहि नाहींत याबद्दल हळहळ वाटल्यावांचून कशी राहील ?

प्रस्तुत ग्रंथास श्रीमंत **बाळासाहेब पंडित प्रतिनिधी,** बी. ए, अधिपति सं. औंध, यांनीं अनेक प्रकारें साहाय्य केल्याबद्दल मी त्यांचा सदैव ऋणी राहीन. आपल्या चित्रसंग्रहांतील उत्कृष्ट चित्रें तर श्रीमं-

तांनीं दिलींच; पण त्या चित्रांसंबंधीं परिश्रमपूर्वक लेख लिहूनहि त्यांनीं सुश्लोकगोविंदास एक अकल्पित अपूर्व लेणें लेवविलें याबद्दल श्रीमंतांस मी शतशः धन्यवाद देतों. रामायणांत एके ठिकाणीं (युद्धकांड १८।१५) श्रीरामचंद्रांच्या तोंडीं पुढील उद्गार निघाल्याचें महर्षि वाल्मीकींनीं वर्णन केलें आहे. सुहृज्जनांच्या साहाय्याबद्दल कृतज्ञतापूर्वक बोलतांना श्रीराम लक्ष्मणास सांगतातः—

" न सर्वे भ्रातरस्तात भवन्ति भरतोपमाः ।
मद्विधा वा पितुः पुत्राः सुहृदो वा भवद्विधाः ॥"

" बाबारे, सर्वच भ्राते भरतासारखे नसतात; सर्वच पुत्र माझ्या-सारखे नसतात; आणि सर्वच मित्रहि तुमच्यासारखे नसतात!" या सूक्तीचा नम्रपणें अनुहुंकार करून असें ह्मणावेंसें वाटतें कीं, " सारेच नृपति श्रीमंतांसारखे नसतात; सारींच काव्यें गीतगोविंदासारखीं नसतात; आणि साऱ्याच अनुवादांना सुश्लोकगोविंदासारखें भाग्य लाभत नाहीं!"

माझे प्रिय मित्र श्री. गणेश श्रीपाद हुपरीकर, एम्. ए. व त्यांचे कनिष्ठ बंधु श्री. गोविंदराव, बी. ए. या उभयतांनीं अत्यंत मनःपूर्वक केलेल्या सूचनांच्या व साहाय्याच्या अभावीं प्रस्तुत ग्रंथ इतक्या लवकर व इतक्या परिपूर्ण स्थितींत प्रकाशनांत येताचना. या बंधुद्वयाच्या संमतीवांचून 'पानहि' हाललें नाहीं असें ह्मटलें तर तें अक्षरशः खरेंच होय.

कवि सुमंत यांनीं 'चेतोहरदेवां'च्या गीतगोविंदाची माहिती सांगून स्वतःजवळची प्रतहि मला पहावयास दिली व इतरहि प्रोत्साहन दिलें. कवि नागेश, प्रो. मा. त्रिं. पटवर्धन, एम्. ए., कवि मुंगळे, श्री. रा. ना. पुसाळकर, बी. ए., एल्एल्. बी. व श्री. मो. स. श्रीखंडे, बी.ए. (ऑनर्स), यांनींहि मला अनेक प्रकारें सौहार्द व रसिकता दाखविली. प्रो. पां. वा. काणे, एम्. ए., एल्एल्. एम्. यांनीं जयदेवाचा एक समकालीन कवि धोयी याच्या 'पवनदूता'ची माहिती पुरवून त्याच्या कलकत्ता प्रतींतील प्रस्तावनेंत जयदेवाच्या कालासंबंधीं वृत्त आढळेल असें अगत्यपूर्वक कळविल्यानें मला त्याचा उपयोग करतां आला. प्रो. कृ. पां. कुलकर्णी एम्.ए. यांच्याशीं सहज झालेल्या भेटींत प्रो. केशवलाल

हर्षदराय ध्रुव-कृत गुजराती गीतगोविंदाची माहिती मला मिळाली व लगेच अहमदाबादहून प्रतहि आणवितां आली ( ता. ११-२-३४ ). तत्पूर्वीच ही प्रस्तावना बहुतेक लिहून झाली होती तरी कांहीं स्थलीं प्रो. ध्रुव यांच्या पुस्तकाचा मला उपयोग करतां आला, हें कृतज्ञतापूर्वक लिहि-तांना मला संतोष वाटतो.

त्याचप्रमाणें माझ्या वडील भगिनी ती. सौ. कृष्णाक्का ( हेड्-मास्तरीणबाई गर्ल्स स्कूल, फलटण ) व माझे मावसबंधु वे. शा. सं. विश्व-नाथ शंकर कात्रेशास्त्री यांच्यासारख्या सहृदय कवींच्या मार्मिक विचारां-चाहि मला आरंभापासूनच बहुत फायदा झाला आहे हें नमूद केलें म्हणजे मी त्यांच्या ऋणांतून मुक्त झालों असें नव्हे. एकंदरींत उपरिनि-र्दिष्ट वा अनिर्दिष्ट अशा अनेक रसिकांच्या प्रोत्साहन-सहानुभूतींच्या सुवर्णकरांनीं ‘सुश्लोकगोविंदा’स जणुं काय झेलून धरलें आहे !

तसेंच येथील श्रीज्ञानेश्वर छापखान्याचे सौजन्यसंपन्न मालक पिता-पुत्र श्री. सहस्रबुद्धे व उत्साही चालक श्री. रा. ना. पोंक्षे यांनीं फार थोड्या वेळांत व अति दक्षतेनें पुस्तकाची सुबक छपाई केली याबद्दल त्यांचाहि साभार उल्लेख केला पाहिजे.

असो. ज्या ईशलीलेनेंच केवळ हा सर्व योगायोग घडून आला, तीस नम्र वंदन करून ही सुदीर्घ प्रस्तावना संपवूं.

श्री. हुजुरबाजार यांचा वाडा,
कोल्हापूर
ता. ३ मार्च १९३४

**रामचंद्र चिंतामण श्रीखंडे**

# कांग्रा व्हॅली चित्रपद्धति

[ श्रीमंत भवानराव श्रीनिवासराव ऊर्फ बाळासाहेब पंडित प्रतिनिधि, बी. ए., अधिपति सं. औंध यांनीं खास 'सुश्लोकगोविंदा'साठीं लिहिलेला लेख. ]

हिंदूंची संस्कृति आणि त्यांच्या विविध ललितकला यांचें आजचें स्वरूप हें आर्य आणि द्रविड संस्कृतींच्या मिलाफापासून तयार झालेलें आहे. ह्या दोन संस्कृतींतील नैसर्गिक भिन्नतेमुळें परस्परविरोधी अशा अनेक घटकांचा यांत समुच्चय झालेला आहे. या संस्कृतींचा मिलाफ-काल हा पूर्वेतिहासकालीन असल्यामुळें या दोन संस्कृतींच्या यथावत् भिन्न कल्पना येण्याचें काम अर्थातच थोडेंसें कठीण आहे. हिंदु चित्र-कलेचा विशेष म्हणजे तिच्यांतील ओतप्रोत जिवंतपणा. त्यासंबंधीं विद्वानांत सुद्धां अद्याप बराच गैरसमज आणि मतभेद आढळतो. तथापि भारतीय चित्रकला ही एके काळीं सर्व सौन्दर्यविषयक ललितकलांचें केंद्र-स्थान होतें, व भारतीय चित्रकलेचा परिणाम अखिल आशियाखंडांतील व कदाचित् आफ्रिकाखंडांतील चित्रकलेवर एके काळीं झाला होता. ही गोष्ट आतां हळुहळु सर्वमान्य होत चालली असून हिंदुचित्रकलेचा पगडा थोडाबहुत पाश्चात्य चित्रकलेवरही बसला होता, हें संशोधनांतीं समजून येऊं लागलें आहे, ही समाधानाची गोष्ट आहे.

जगांतील इतर कलांच्या प्रमाणें भारतीयांच्या चित्रकलेचें ज्ञान विश्वविद्यालयांत तिचा केवळ अभ्यास करून होण्यासारखें नाहीं. हिंदूंचें जीवित आणि त्यांची चित्रकला ह्यांचा अभेद्य आणि अगदीं एकजीव संयोग झालेला असून हिंदू लोकांची राहणी, त्यांच्या रीतिभाती, त्यांचे आचारविचार यांचें सम्यग् ज्ञान झाल्याविना भारतीय चित्रकलेचें यथार्थ

स्वरूप कधींच आकलन करणें शक्य होणार नाहीं. आमच्या कला आणि आमची संस्कृति ह्या एका अर्थी अगदीं समकालीन आहेत. आमच्या मतें हिंदुस्थानच्या खऱ्याखुऱ्या इतिहासाचें ज्ञान मिळविण्यास येथील इतिहासांत नोंदले गेलेले प्रमुख प्रसंग आणि त्यांच्या सनावलीपेक्षां हिंदुस्थानच्या कलांचा इतिहासच अधिक उपयोगी होईल.

रजपुताना, बुंदेलखंड आणि पंजाब हिमालय या ठिकाणीं जन्मास आलेल्या रजपूत चित्रकलेचें काँग्रा व्हॅली चित्रपद्धति हें शेवटचें परंतु सर्वोत्कृष्ट अपत्य आहे. रजपूत चित्रकलेचे सर्वच प्रमुख विशेष यांत उतरलेले आहेत.

सतलज नदीच्या पश्चिमेकडील डोंगराळ मुलुखांत जन्मास आलेली जम्मु चित्रपद्धति आणि त्याच नदीच्या पूर्वेकडील जालनपूर वगैरे डोंगराळ संस्थानांत निर्माण झालेली काँग्रा व्हॅली चित्रपद्धति ही रजपूत चित्रकलेची वाखाणण्यासारखीं अपत्यें होत. सिमल्याच्या पूर्वेकडील गढवाल संस्थानांत जन्मास येणाऱ्या आणि त्याच संस्थानच्या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या गढवाल चित्रपद्धतीचाहि काँग्रा व्हॅली चित्रपद्धतींतच समावेश होतो. राजा रणजितसिंग आणि राजा शिरसिंग यांच्या अमदानींत अमृतसर आणि लाहोर या ठिकाणीं भरभराटीस आलेल्या शिख चित्रकलेचाहि काँग्रा व्हॅली चित्रपद्धतींत समावेश करतात. गढवाल चित्रपद्धतींचा उगम काँग्रा व्हॅलीपासून अठराव्या शतकाच्या अखेर अखेरीस झाल्याचें स्पष्ट दिसतें.

काँग्रा व्हॅलीची भरभराट जशी सपाट्याची तसेंच तिचें आयुष्यसुद्धां अल्प ठरलें. तथापि दीर्घायुष्याचा हा मुद्दा क्षणभर दूर सारला तर भारतीय चित्रकलेचा नांवलौकिक सर्व जगभर पसरविण्यास काँग्रा व्हॅली पुष्कळच कारणीभूत झाली हें निर्विवाद आहे. रजपूत कलेचे सर्वच कलाविषयक विशेष तिच्यांत केन्द्रीभूत झालेले आहेतच. परंतु मोंगल पद्धतीचादेखील अस्पष्ट ठसा तिच्यावर उमटल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसतात.

रजपूत चित्रपद्धति आणि मोंगल चित्रपद्धति यांचा तुलनात्मक अभ्यास फारच मनोरंजक होईल, पण या ठिकाणीं तो देण्याचें फारसें

प्रयोजन नाहीं. नुसत्या दृष्टिक्षेपानेंदेखील या दोन्ही चित्रपद्धतींतील ठळक गुणदोष चटकन डोळ्यांत भरतात एवढें सांगितलें ह्मणजे पुरे. त्यांचे दोघांचे विषय जसे भिन्न तसेंच ते रंगविण्याची पद्धतसुद्धां अगदीं वेगळी वेगळी. मोंगल चित्रकार आपल्या चित्रांतील प्रसंगाशीं अगर व्यक्तीशीं तात्काळ तल्लीन झालेला आढळतो यामुळें मोंगल चिपद्धतीहि एका अर्थी वस्तुनिष्ठापर आहे. उलट रजपूत चित्रपद्धति ही दिसायला भव्य, उदात्त आणि त्याचबरोबर नाजूक असली तरी चित्रांतील वर्ण्य विषयांचे पूर्वापार संदर्भ–विषयक ज्ञान झाल्यावांचून त्या चित्राचा प्रेक्षकाला अर्थबोध होत नाहीं. रजपूत चित्रकलेचें सामान्य स्वरूप प्राचीन तर मोंगल चित्रकलेची धाटणी अर्वाचीन स्वरूपाची आहे.

कांग्रा व्हॅली चित्रपद्धतीचा उत्कर्षकाल म्हणजे आठराव्या शतकाचा उत्तरार्ध आणि एकोणिसाव्या शतकाचा पूर्वार्ध असें म्हणण्यास हरकत नाहीं. मृदु आणि ढिसूळ रंगांनीं भरलेलीं या पद्धतीचीं चित्रें काढावयाला एका अर्थी सोळाव्या शतकाच्या अखेरीपासूनच सुरवात झाली असें म्हणावयाला हरकत नाहीं. कांग्रा येथील शेवटचा कटकाधिपति राजा संसारचंद्र याच्या सन १७७४ ते १८२३ च्या कारकीर्दीतच या कलेनें खराखुरा उत्कर्षबिंदु गांठला. सुजाणपुराजवळ बिआसनदीच्या तीरावरील राजासंसारचंद्राच्या असलेल्या भव्य प्रासादांची आणि रमणीय उद्यानांचीं चित्रेंच बहुतेक या चित्रपद्धतींत उतरलेलीं आहेत. एकदां लढाईवरून परत आल्यावर पुन्हा लढाईवर जाईपर्यंतचा आपला काळ राजा संसारचंद्र आपल्या वरील राजवाड्यांत कवींचीं काव्यें आणि गवयांचीं गाणीं ऐकण्यांत घालवीत असे. आणि ह्या कालांतच कांग्रा व्हॅली चित्रपद्धतीचीं चित्रें निर्माण झालेलीं आहेत. श्रीकृष्णलीला, नायकनायिकाभेद, विशेषत: खंडिता, वासकसज्जिका कलहान्तरिता, अभिसारिका, विप्रलब्धा, प्रोषितभर्तृका, स्वाधीनपतिका आणि उत्कंठिता या अष्टनायिकांचे मुग्धा, मध्यमा आणि प्रौढादि भेद दाखविणें, नलदमयंतीसारखीं प्रणयविषयक प्राचीन अगर हमीरहाटासारखीं अर्वाचीन कथानकें, हे कांग्रा व्हॅली चित्रपद्धतीचे विषय होत. या चित्रपद्धतींतील बहुतेक चित्रांचीं वर्णनें देवनागरी लिपींत लिहिलेली असून केशवदास किंवा

दुसरा एखादा प्रख्यात हिंदी कवी यांच्या काव्यांतून उद्धृत केलेलीं आहेत.

संसारचंद्र राजाचे भव्य प्रासाद, त्याचीं मनोहर उद्यानें, त्यामागें ठेंगू टेंकड्याआड वळणावळणांनीं राहणारी बियास नदी आणि दूर दिसणारीं हिमगिरीचीं बर्फाच्छादित शुभ्र शिखरें इत्यादींनीं कांग्रा व्हॅली चित्रांची पार्श्वभूमि सजविलेली आहे. गळ्याशीं आणि कंबरेशीं बांधावयाचा बायकांचा जांगोली नांवाचा झगा ह्या चित्रपद्धतींत सर्हास वापरण्यांत आला असून त्या पद्धतीचें हें विशिष्ट अंग आहे. प्रस्तुत पुस्तकांतील अभिसारिका चित्रावरून बायकांच्या या झग्याच्या सामान्य स्वरूपाची कल्पना कोणासही येण्यासारखी आहे. हा झगा गळ्याशीं आणि खालीं कंबरेंत बांधावयाचा असल्यामुळें स्त्रियांच्या छातीचा किंचित् उघडा पडणारा उन्नत भाग फारच मनोहर दिसतो. या झग्याची अनेक वलयांकित असणारी लांबच लांब शेपटीसुद्धां फारच आकर्षक दिसते.

कांग्रा व्हॅली चित्रपद्धतीहि प्रामुख्यानें वस्तुनिष्ठपर आहे. मोंगलचित्रपद्धतीचे आणि क्वचित् पाश्चात्य चित्रपद्धतीचेसुद्धां तिच्यावर स्पष्ट ठसे उमटलेले दिसतात. मशाल्यांच्या आणि भुसनळ्यांच्या प्रकाशांत वस्तूंच्या सावली लांबच लांब दाखवून अंधाराचें स्वरूप व्यक्त करण्याचा कांहीं चित्रांत प्रयत्न केलेला आहे. अत्यंत नाजूक पण त्याचबरोबर नखरेबाज आणि हृदयाला चटका लावणारी गोड स्त्रीआकृति रेखाटण्यांत तर कांग्राव्हॅली चित्रपद्धतीचा हातखंडा दिसतो. या चित्रपद्धतीच्या चित्रांत राजस्थानी चित्रांतील स्त्रियांचा कणखरपणा नाहीं. पण त्याचवेळीं चित्रांतील प्रत्येक रेषेंत करारीपणा आणि निश्चयीपणा ओतप्रोत भरलेला आढळतो. चित्रांतील प्रत्येक अवयवाची हालचाल जणूं मादक जादूनें भरलेली असावीशी वाटते. आणि अवास्तव मागें लांब लोंबणाऱ्या बुरख्याच्या शेपटीमुळें तर त्या चित्रांतील आकर्षकता अधिकच वाढते.

या पुस्तकांत अष्टनायिकामालेंतलीं फक्त पांचच चित्रें घेण्यांत आलेलीं आहेत, पण सर्वच उत्तम असून या चित्रकलेची यथार्थ कल्पना आणून देण्यास पुरेशीं आहेत. ' धावत्या अखंड रेषा काढण्याची या चित्रपद्धतींतील चित्रकारांची आवडती लकब दिसते. अशा प्रकारच्या

धावत्या रेषा वारंवार काढून त्याच त्याच स्वरूपाची पुनरुक्ति करण्याच्या खोडीमुळें सौंदर्यविविधतेच्या दृष्टीनें या कलेला थोडें गालबोट लागलें आहे हें खरें आहे; परंतु परिणामाच्या दृष्टीनें हा उणेपणा कुठच्या कुठें पार नाहींसा होऊन कुशल चित्रकाराच्या कलमांतून उतरलेल्या स्त्री-स्वरूपाची मौज एखाद्या रूपगर्वितेच्या सौंदर्यासारखीच उन्मादक दिसते.

कांग्रा व्हॅली चित्रपद्धति ही मानवी विकारापेक्षां हळूवार मानवी भावनांवरच अधिष्ठित झाल्याचें स्पष्ट दिसतें.

औरंगजेब बादशहानें—हुमायून, अकबर, जहांगीर व शहाजहान बादशहांनीं मोठ्या प्रेमानें बाळगलेले ललितकलांचे तज्ञ आपल्या मोंगल राज्यांतून काढून टाकल्यावर या गुणीजनांपैकीं मंडळी जिकडे जिकडे आश्रय मिळेल तिकडे जाऊन राहिली. भोलाराम इत्यादि नामांकित चित्रकार कांग्रा व्हॅलींत रामपूर संस्थानांत व इतर हिमालयांतील संस्थानांत जाऊन राहिले. त्यांनीं तेथें आपल्या चित्रकलेचा प्रसार केला. वास्तविक ही कांग्रा व्हॅली चित्रकला मूळ अजंठापासून निघालेली, जयपुरांत जीव धरून राहिलेली, मोंगल बादशहांनीं इराणी चित्रकलेशीं मिश्रण करून सजविलेली अशी भारतीय आर्यद्राविड चित्रकला आहे. यांत भावनिदर्शन कित्येक चित्रांत उत्तान आहे तर कित्येकांत फार सूक्ष्म आहे. मात्र मोंगलांच्या सहवासानें स्त्रियांचीं चित्रें बरींच नाजूक काढण्याकडे—जयपुरापेक्षां नाजूक काढण्याकडे— चित्रकारांची प्रवृत्ति आहे. आमच्या संग्रहीं कांग्रा व्हॅली, गढवाल, जयपूर, केवळ मोंगल, व इराणी पद्धतीचीं अनेक चित्रें आहेत. त्यावरून ही सर्व कला आर्यद्रविड मिश्रणापासून आणि अजंठ्या-पासूनच निघाली असावी असें अनुमान काढण्यास बळकट पुरावा आहे.

---

ॐ नमो भगवते वासुदेवाय

# सुश्लोकगोविंद

## सर्ग पहिला

[ वंदन ( श्लोक १ ); प्रास्ताविक ( २-४ ); **प्रबंध १ ला**-श्रीकृष्णाच्या दशावतार स्वरूपांचें स्मरण व स्तुति ( ५-१६ ); **प्रबंध २ रा**-श्रीकृष्णस्तव ( १७-२६ ); काव्यवस्तुप्रारंभ ( २७ ); **प्रबंध ३ रा**-कामज्वरपीडित राधिकेस लिची सखी वृंदावनांतील वसंतशोभेचें वर्णन करून सांगते ( २८-३८ ); **प्रबंध ४ था**-ती सखी राधिकेस श्रीकृष्णाच्या इतर गोपींसह चाललेल्या रासलीला दाखवून वर्णन करते ( ३९-५० ); सर्गसमाप्ति, शुभाशीर्वाद ( ५१ ). ]

पूजा प्रेमें करित रमणी राधिका ती फुलांनीं;
—रूपानें कीं मदन दुसरा, चित्त जावें भुलोनी—
जो राधेच्या हृदयकमलीं भृंग जैसा बसावा,
माझ्या चित्तीं मुरलिधर तो सर्वकालीं असावा १

* * *

“ मेघांनीं भरलें समस्त नभ हें, तालीं वन श्यामल,
रात्रीं भीत हरी, तयासह घरीं तूं राधिके गे ! चल.”
ऐसा नंद-निदेश ऐकुनि निघे ती माधवासंगतीं—
कुंजांतीं यमुनातटीं; मधुर तल्लीला असो ! धन्य ती २

हृदय-सदनिं ज्याच्या शारदा चित्रलेखा,
झुकवि पद करी जो हृष्ट पद्मेशि, देखा

त्रिभुवन-रमणी त्या कृष्ण-शृंगार-लीला
हरि-पर जयदेवें गावया यत्न केला ३

जरि हरिस्मरणीं रमणें घडीं,
जरि विलास-कलांमधिं आवडी,
मधुर कोमल ही पदपद्धती
परिस रे ! जयदेव-सरस्वती. ४

* * *

प्रलय-सागरीं वेद तारिले, । सहज दाविलें चित्र थोरलें,
प्रकट धेशि तूं मत्स्यरूप तें; । जय हरे जय श्रीजगत्पते ! ५

विपुलपृष्ठिं त्या भूमिधारणें- । बहु गरिष्ठही होय तें किणें
धरियलेंसि तूं कूर्मरूप तें; । जय हरे ! जय श्रीजगत्पते ! ६

दशन-लग्न ती भू दिसे कशी ? । शशिकलेवरी त्या कलंकशी,
सहज रक्षिली यज्ञ-सूकरें; । जय जगत्पते केशवा हरे ! ७

तव करांबुजीं तीक्ष्ण त्या नखें- । असुरभृंग तूं फाडिला सुखें,
नृ-हरि-रूप जो घेइ भीषण, । जय जगत्पते विश्वभूषण ! ८

छळियला बळी विक्रमूनिया, । पदजलें जगा शोधिलेंसि या,
नमन अद्भुता वामना तया; । जय जयाजि हो ! हे महाशया ! ९

रुधिर जें वसे क्षत्रियांतरीं, । भुवनिं सिंचुनी ताप संहरी,
भृगुपति प्रभो ! होशि तूं तया, । नमन माधवा श्रीहरीसे या. १०

दश दिशीं दिला इंद्रकाम्यही, । दश-शिरो-बली, तारिली मही;
रघुवरा घनश्यामसुंदरा । जय जगत्पते धैर्य-मंदरा ! ११

हलभयें नदी ती यमस्वसा । निकट ये, तिचा रंग तो जसा,
वसन शोभलें मेघनील तें; । जय जगत्प्रभो रेवतीपते ! १२

अहह ! वेदिंही हिंसणें कसें ? । निगमवाक्य तूं निंदिलें असें;
सदय घेतलें बुद्धरूप तें । जय हरे जय श्रीजगत्पते ! १३

भयद खड्ग कीं धूमकेतु तो, । करिं धरूनियां म्लेच्छ नाशितो
प्रकट घेउनी कल्कि-रूप तें; । जय हरे जय श्रीजगत्पते ! १४

मद्वनार्थ गा ! तूं अशापरी । अवतरूनि या येशि भूवरी.
सुकविराज जें गीत बोलला । वदन ' राम ' हा अर्थ त्यांतला १५

वेदां उद्धरतो, जगासि भरतो, भूगोल तो तोलतो
दारी दैत्यवरा, बळीस छळितो, क्षत्रप्रजा नाशितो
मारी रावण, नांगरासि धरितो, कारुण्य विस्तारितो
म्लेच्छां निर्दळतो, दशाकृति अशा श्रीशासि मी वंदितों १६

* * *

निजला कमलास्तनीं श्रमोनी
श्रवणीं शोभतिं कुंडलेंहि दोनी
जय भो ! मकरंद-पुष्प-लोल–
वनमालाधर, हे तमालनील ! १७

भवखंडन शोभलासि यानें
दिनराजद्युतिगोल मंडनानें
मुनिमानसराजहंस देवा !
जय ! दे वारिजनेत्र ! पादसेवा. १८

जय; कालियनागगंजना हे !
अवतार प्रियलोकरंजना हे
यदुवंशसमुद्रचंद्रबिंबा
जगदंबापतिराज गोपडिंभा ! १९

मधुमर्दन माधवा मुरारे !
नरकारे नरसिंहविक्रमा रे !
बहु केलिविनोद तूंचि केला
सुरमेळा बघण्यास तो भुकेला. २०

नयनें अमलाब्ज–पत्र–शोभें
लय पावे भवभीति, मुक्ति लाभे.
करुणामय तूंचि एक लोकीं
अरुणापांग ! तुझ्या जनां विलोकीं. २१

जननी जनकात्मजा जयानें
जन-कांतें वरिली सदा-जयानें
खरदूषणनाशना तयातें
सखयातें नति रावणांतकातें. २२

धृतमंदरभूधरा सुधीरा
नवधाराधरसुंदरा उदारा !
कमला तुज जेंवि आवडे ती
न चकोरासिहि तेंवि चंद्रकांति. २३

शरणा चरणा तुझ्या रिघालों,
शुभमूर्ती तव कीर्ति गात आलों;
प्रणतीं कुशला करीं सख्या रे !
जय देवा ! जय हे हरे ! मुरारे ! २४

परिसोनि रसोत्कटा अशी ती–
मधुरा श्रीजयदेवरम्यगीति

नमितां कविराजपादपद्मा,
रसमग्ना मुदिताहि होय पद्मा. २५

*  *  *

सुगंधीं काश्मीरें कवळुनि अशीं श्रीस्तनतटें—
नटे जें मुद्रेनें, प्रकटित जणूं प्रेम निपटें,
उठे ज्या सर्वांगीं दमुनि सुरतस्वेदलहरी,
हरीचें तें वक्षस्स्थल-कमल युष्मन्मल हरी. २६

*  *  *

वासंतीसुमकोमला म्हणत जी भेटो मला श्रीहरी,
आशा ही बहुवार धाडुनिहि त्या दूती न हो ती पुरी;
कांतारीं भटके, अमंद झटके कामज्वरें यन्मनीं,
त्या राधेप्रति बोलली सहचरी वाणी मनोमोहिनी. २७

" किति मधुर विराजे, राधिके ! हा वसंत
परि विरहिमनाला ताप देई अनंत
प्रियतम ललनांना एकला गांठुनीया
मुदितहृदय नाचे कृष्ण वृंदावनीं या. २८

हा मंद गंधयुत दक्षिणवायु येतो
सान्या लवंगलतिकेवरुनी वहातो;
या कोकिळा कलरवें श्रुतिरम्य गाती,
गुंजारवासि करि संप्रति भृंगपंक्ती २९

येतां वसंत हृदयीं स्मर हा उदेला;
बाला विलाप करि, वल्लभ दूर गेला !
झाले पहा बकुलपुष्परसांत दंग —
अत्यंत नील-तनु हे मदमंद भृंग. ३०

जो गंध हा नव तमालदलासि येतो,
कस्तूरिकापरिमलासिहि लाजवी तो.
आरक्त रम्य कुसुमें पळसांसि आलीं
कीं त्या नखीं युवहृदीं स्मर घाय घाली ! ३१

सम्राट् रतीश भगवान् पृथिवीपतीचें
हें केशरी सुम असे नृपचिन्ह साचें;
त्याचेचि हे दिसति पाटलिपुष्प भाते,
कृष्णांगभृंग जणुं सायक त्यांतले ते ! ३२

पाहोनियां गलित लज्जित लोक सारे
' कां हो ! ' असें करुणपादप* हांसणारे !
नोहेत केतकिसुमें; परि गौरवाले !
हे, राधिके, विरहिकुंतनयोग्य भाले ! ३३

या गंधयुक्त बहु शोभति रम्य वेली
जाई, जुई, मधुर माधविका, चमेली;
कामीजनांप्रति अकारण बंधु झाला
तो हा वसंत भुलवी मुनि-मानसाला. ३४

आम्राप्रती कवळिते अतिमुक्त वेल
रोमांच कीं मुकुल ते प्रकटी रसाल !
पावित्र्यमूर्ति यमुना जवळींच वाहे
वृंदावनांत हरि त्या, सखि ! खेळताहे. ' ३५

वासंतकाल-वनवर्णन-भारतीचा
उच्चार कीं हृदयिं कांत उभा रतीचा;

---

* एक प्रकारचे वृक्ष

भक्तिप्रदा कवि पदा जयदेव गाई
तत्सारलेशहि पितां, मन धन्य होई ! ३६

" दिग्देशीं दशही पराग उधळी ही मल्लिकेची कळी,
नाहीं पूर्ण विकासली जरि तिची ती एकही पाकळी;
वाहे वायु वनीं, मना करपवी, जो केतकी–बांधव
तो कीं प्राण, अनंगबाणहृदयीं संचारणारा नव ! ३७

पुष्पामोदमरंदलुब्ध अलिंनीं हाले रसालांकुर,
कूजी कोकिळ त्यावरी कलरवें, निर्मीत कर्णज्वर;
ऐसे हे दिन दुःखकारक किती पांथस्थ लोकांसि या,–
कीं ज्यांना क्षण एक लाभलि मनीं ती ध्यानमात्रें प्रिया ! "३८

* * *

" नारी अनेक परिरंभुनि आदरानें
तो वेणु वाजवि, भरी कलनाद रानें.
लीला करी किति तरी बघ, हा मुरारी,
राधे ! " वदे सहचरी मृदु बोलणारी ३९

" सुंदरी-निकर-चित्तमंदिरीं
इंदिरावर अमंद संचरी;
नंदनंदन पहा, सुलोचने !
गंधयुक्त घननीळ चंदनें. ४०

नीलांग, पीतवसनें बहु शोभणारा,
आपादलंबिवनमाळहि घालणारा;
गंडस्थलांसि मणिकुंडल मंडिताहे,
लीलां रचेल न कशी रतिपंडिता हे ? ४१

कोणी पयोधरवती युवती हरीतें
आलिंगुनी प्रणयिनी बहु मोद देते
हे राधिके भुवनसुंदरि , ऐक बाई !
ती कामिनी मधुरपंचमराग गाई. ४२

अन्या विलासपर लोलविलोचनाचे
दृष्टी विलोकुनि कटाक्ष सकाम नाचे;
ध्याते पुन्हां अधिकसुंदर माधवाला
मोहोनि गोपि मदनें हृदिं चारु बाला. ४३

बोलावया गुज दुजी सरसावली ही
चुंबूनियां मुख सुधाधर चाखलीही !
रोमावली उभविली हरिच्या कपोलीं;
स्वेदें करांगुलि हिची बहु झालि ओली. ४४

गोपांगना शशिमुखी दुसरी पुढारी
होऊनि केलिमधुरामृत चाखणारी,
हस्तीं दुकूल धरुनी यमुनोपकंठीं
ओढी तदा हरिस कामुक कंबुकंठी. ४५

तीं कंकणें मधुर वाजति वेणुसंगें,
टाळ्या पिटीत तरुणीजन त्यांत रंगें;
जी नाचली बहुमनोज्ञ बरोबरीनें,
वाखाणली चतुर ती युवती हरीनें. ४६

आलिंगि तो युवति एक भुजानवल्ली,
अन्या मनोहर नितंबवतीस चुंबी,

हांसोनि पाहि अपरोसि, रमे दुजीशीं;
ती वेगळीच परि, शोधित कृष्ण जीसी!" ४७

* * *

शृंगारसारविपुला जयदेव-वाणी,
पद्मेश-वृत्त, मग काय रसासि वाणी?
वंदोनियां तिजसि सद्‌हृदिं बैसलीला
वर्णीयली मधुर ही हरि-रासलीला. ४८

"भक्तांतें अनुराग दावुनि तयां जो नित्य संतोषवी,
जो इंदीवर-नील-कोमल-तनू कामोत्सवा वर्षवी,
प्रत्यंगीं ललनाजनीं व्रजवनीं स्वच्छंद आलिंगिला,
तो शृंगारचि मूर्त माधव इथें क्रीडेंत गे! रंगला. ४९

बैसोनी जवळीं, भुजंग कवळी! त्याची नको सावली
ईहा हीच, 'बुडूं! हिमाचलजलीं,' श्रीखंडशैलानिलीं.
आम्राग्रीं सखि राधिके! स्वनवतीं, भृंगीं रजःपिंजरीं
हर्षें कोकिळ कूजती कलरवें, पाहोनि या मंजरी." ५०

* * *

हर्षें रासरसीं पहात असतां शृंगारिल्या गोपिका
आलिंगी घननीळ कांत हरिला प्रेमांध ती राधिका;
'हे कृष्णा! मृगयूथ मंजुळ रवें पायीं तुझ्या लोभला'
राधेनें बहु चुंबिला स्तुतिमिषें, आम्हां असो तो भला! ५१

सामोददामोदर नामक
पहिला सर्ग
समाप्त

## सर्ग दुसरा



[ **प्रबंध ५ वा**-विरहदु:खांत असलेली राधा, श्रीकृष्णाच्या **इतर गोपींसह** चाललेल्या शृंगारलीला पाहून आपल्या सखीस बोलते ( श्लोक **१-१०**); **प्रबंध ६ वा**-कामार्त राधा, श्रीकृष्णासह विहारसौख्य आपणास केव्हां **लाभेल** असें सखीस विचारते ( ११-२० ) व ( २१-२५ ); सर्गांतीं आशीर्वाद(२६ ).]

आहे क्रीडत अन्यगोपयुवतीसंगें वनीं श्रीहरी,
ऐसें देखुनि मंदभाग्य अपुलें रागेजली अंतरीं;
गेली तेथुनि राधिका, प्रविशली कुंजीं स-गुंजारवीं,
बोले दीनपणें; स्वदु:ख सखितें एकांतिं ती ऐकवी. १

" वृंदावनीं करित जो बसला विलास —
गोपींसवें, स्मरत मन्मन त्या हरीस;
गोपींसमान इतरां मजसीहि लेखी;
केला सये, यदुवरें परिहास शेखीं ! २

हा वाजतो परिस गे ! श्रुतिरम्य पांवा,
ओष्ठांतला मधुरिमा न कधीं लपावा !
फेकी कटाक्ष, कमलाक्ष मुकुंद डोले,
स्वीकारिली तरलकुंडलभा कपोलें. ३

केसांमधें रचुनि मोरपिसें सुरंगी —
लावीतसे जणुं पिसें मजलागिं शार्ङ्गी.
हा सांवळा; वरि शिरीं वलयें पहा तीं
मेघांवरी दिसत इंद्रधनुष्यकांति ! ४

जो लोभला तरुण गोपनितंबिनीचें,
घेऊनि चुंबन; तयासह हृष्ट नाचे;
ज्याच्या सुधेसम असे अधरांत गोडी,
त्याचें मनोज्ञ-गुणाचिंतन मी न सोडीं. ५

रोमाञ्च-काय हरि हा युवती सहस्र–
आलिंगितो, अगइ ! साहस हें अजस्र !
हस्तीं पदीं झळकतीं मणिभूषणें हीं,
त्याची प्रभा तिमिर सर्व निवारि पाहीं. ६

तो शुभ्रचंदन टिळा सुविशालभाळीं –
मेघात इंदुसम शोभत अंतराळीं;
जें मांसल स्तन विमर्दुनि शौर्य दावी,
त्या ह्या उरांत किति निर्दयता वदावी ! ७

गंडस्थलें मकरकुंडलिं मंडिलेलीं
रत्नप्रभा नयनरम्य उदंड ठेली;
नेसूनि पीतवसना सजला उदार;
घाली मुनींद्रसुरसंघ तयासि घेर. ८

जो हा कदंबतरुखालतिं डोलताहे
नाशी असें कलिमला वच बोलताहे
ते लोल गे ! मदनपूर्ण कटाक्ष त्याचे
पाहोनिया थयथया मम चित्त नाचे !" ९

* * *

जें रम्य गीत जयदेव कवींद्र बोले –
श्रीवासुदेवपदभक्तिरसेंहि ओलें,

तें आवडो हरिपदीं रमल्या मनाला;
श्रीरामताप झणिं तेथ असे निमाला. १०

“ मुळिंच न बघे दोषा, योषा मदन्य जरी हरी,
गुणगण गणी, आणीं नेणी विचार विनाहरी –
मम मन खुळें, माझे बाळे ! मनोहर सांवळा –
सुरभिसुमनो-मालाधारी धरी हरिचा लळा. ११

नयनसुंदर देवकिनंदन
सखि ! बघीन कधीं मधुसूदन ?
मदन निष्ठुर वर्षवि आंसवें,
रमविं गे ! मज वेगिं तयासवें. १२

एकांत सेवुनि निशासमयीं नितांत,
अत्यंत कामभरहर्षित चित्तकांत –
ऐसा मुरारि कधिं पाहिन गूढकुंजीं –
मी भीत भीत झणिं जाउनि वृक्षपुंजीं ? १३

ही लाजली प्रथम भेट ह्मणूनि रामा,
बोले किती वच, न पावत तें विरामा;
हास्यें करून अनुकूल, मला न सोडी
ऐसा मुकुंद कधिं गे ! मज वेगिं ओढी ? १४

शय्या करूनि कुसुमावलिची निजेली,
माझे हृदीं हरि निजूनचि रात्र गेली –
आलिंगुनी, मधुर तन्मुख-सारसाचें
चुंबीन गे कधिं गडे ! वद सार साचें ? १५

क्रीडाश्रमें नयन ते जड फार झाले,
अंगावरीहि जलबिंदु अनेक आले,
ऐशी कधीं पुलकितांग हरी बघीन,
जो जाहला मदभरें मदना अधीन? १६

गे! लाजवीत कलकूजन कोकिळेला,
वेणींतला कुसुम-हारहि सैल झाला,
ऐशा मला कधि सये! रतिशास्त्रधीर –
रेखील सुंदर नखें स्तनयुग्मिं वीर? १७

पायांत नूपुर करी रुणझूण गोड,
ही मेखला पुरवितें श्रुतिचेंहि कोड,
केव्हां मुकुंद रतिसंगर सपवोनी –
वेणी धरूनि मम चुंबिल गाल दोनी? १८

भोगोनियां सुरत मी श्रमलेलि आहें,
तोले न गे! तनुलता पडली श्रमें हे,
ऐशी विलोकिन कधीं मदनार्त कृष्णा –
अर्धप्रफुल्लनयना? मम हीच तृष्णा!" १९

राधा असें निजसखीस निवेदिताहे
शृंगारसार बहु ज्यांत भरोनि वाहे;
ती सुंदरेंदुवदना करि हावभाव,
माधुर्यपूर्ण वदणें रमणीस्वभाव! २०

* * *

हरीजवळिं राधेतें ने सखी सुखदायिका;
हरी मानस कृष्णाचें, बोले सखिसि राधिका..२१

* * *

" त्या भोंवतीं बल्लवसुंदरी जरी,
पाहे कटाक्षें मज हर्षवी हरी;
स्वेदार्द्र गंडस्थल शोभतें किती !
कृष्णाप्रती मन्मति लोभते अती. २२

मजवरि वळली जों कृष्णदृष्टी विलासी,
नकळत गळली तों बांसरी हस्तवासी;
चपळ, न ढळलीं तीं नेत्रपद्में हरीचीं
मजसिहि कळली कीं, दृश्य ती वस्तु मीचि ! २३

शोभे जसा कमलिनींमधिं राजहंस,
तैसा हरी युवतिवेष्टित मांसलांस,
पाहोनियां मजसि सुंदर हासतो गे !
या माधवासि बघुनी मन डोलुं लागे. २४

अशोकाच्या गुच्छा मजसि बघवेना क्षणभरी,
तडागाच्या तीरीं दुखवि हिमही वायुलहरी,
रसालांच्या माथां जरिहि घुमती भृंगयुवती,
प्रभा हीं पुष्पांची सखि ! **शिखरिणी** सौख्यद न ती." २५

* * *

गालीं हास्य विकासलें, विखुरली वेणी, चढे भूवई,
दावाया स्तन, बालहस्तक, भुजा, बुद्ध्या दिली जांभई,
गोपीहृद्गत देखुनीहि दुसरी कोणी परी अंतरीं
चिंती जो चिरकाल तोचि तुमच्या क्लेशा निवारो हरी ! २६

**अक्लेशकेशव नामक**

**दुसरा सर्ग**

**समाप्त**

# सर्ग तिसरा

[ **प्रबंध ७ वा**. श्रीकृष्णाचे विरहोद्गार; ( श्लोक १-१६ ) **सर्गोपसंहार, आशीर्वाद** ( १७ ). ]

श्रीकृष्णें संसारीं तृष्णाकरिणीसि शृंखला राधा
हृन्मंदिरीं वसवुनी गोपींचा वृंद टाकिला साधा. १

क्रूरें स्मरें सुमशरें हृदिं घाव केला,
शोधावया हरि निघे प्रिय राधिकेला,
झाला मनांत अनुतप्त, तसा फिरेही
कुंजांत जाइ, यमुनातटिं खिन्न राही. २

" हर ! हर ! चुकलों मी. सुंदरी कोपवीली;
मजवर बहु होती प्रीति ती लोपवीली;
इतर युवतिलोभें धिक्कृता राधिका ही;
लव तरि अपमाना मानिनी कोण साही ! ३

त्या सुंदरी पाहुनि भोंवतालीं
मीं ज्यांमधें सेवन केलि केली.
न मानिली मीं, अपराध केला !
भीतें न मीं वारिलि राधिकेला. ४

संतापला त्या विरहेंच काय
करील ती काय ! वदेल काय !
जनांत ना सौख्य ! धनांत नाहीं !
नसे गृहीं ! निष्फळ जीव हाही ! ५

स्मरे मला आनन सुंदरीचें
रोषें वरी भ्रूकुटि वक्र नाचे,
भासे जणों अंबुज लालरंगी
ज्याचेवरी चंचल नीलभृंगी. ६

हो राधिका मद्हृदयाब्जवासी.
सदा असें क्रीडत मी तियेसीं.
कशास वेडा वनिं धुंडतों मी?
उगाचि कां मी करिं शोक कामी? ७

तुला करी खिन्न जरी असूया
ये ये प्रिये! येथ सुखें बसूंया.
गेलीस कोठें मज हें कळेना!
म्हणूनि शोधार्थहि मी वळेना. ८

भासे मला तूं दिससी पुढेंशी
अदृश्यही होशि पळांत कैशी?
नित्यापरी सुंदरि! रूपराशि!
तूं गाढ आलिंगन कां न देशी? ९

क्षमा करीं, ये, मजपासिं बैसें,
पुन्हां कधींही न करीन ऐसें!
मी पीडिलों फारचि या स्मरानें
ये, भेट दे सुंदरि! आदरानें." १०

* * *

त्या किंदुबिल्वाब्धिभवेंदुनें जें
संगीत केलें जयदेवराजें,

वंदोनियां कृष्णपदां सुरम्यां
भावार्थ त्याचा वदला असे म्यां. ११

* * *

" हृदयिं रुळतो नोहे नाग, प्रभो ! बिसहार हा,
कुवलयमयी नीला माळा गळां, विष ना ! पहा;
धवल, मदना ! अंगीं तें हें न भस्महि, चंदन;
विरहि हरि मी, शंभुभ्रांत्या नको करुं कंदन ! १२

हातीं घेशि कशास चूतशर हा ? तें चाप कां ओढिशी ?
वीरा ! मारुनि मूर्च्छिता, अयश कां विश्वप्रभो ! जोडिशी ?
झालों जर्जर मी, कटाक्षशर ती फेंकी मृगीलोचना
मूर्च्छा लेशहि, सज्जचापमदना ? अद्यापि जाईच ना ! १३

भ्रू वक्र ती जणुं धनुष्य, कटाक्ष बाण
तो कर्ण होय गुण ज्यासि नितान्त ताण,
जिंकोनि विश्व अवघें, स्मर या हत्यारीं
तीं ठेवि त्या युवतिरूप चलीं अगारीं १४

भ्रूचापीं स्थित तो कटाक्षशर गे ! निर्मील मर्मव्यथा
काळा केशकलाप वक्रचि, करो साहाय्य त्या मन्मथा;
हेंही योग्यचि कीं, विलासिनि ! तुझा मोहील बिंबौष्ठही
मारूं पाहि मला सुवृत्त (!) कुच हा, कैशी घडे गोष्ट ही ?१५

तीं तीं स्पर्शसुखें, सुधामय तशी वक्रोक्ति वाणींत जी
स्नेही चंचल दृष्टिविभ्रम, तसा सद्गन्ध वक्त्रांबुजीं
ती बिंबाधरमाधुरीहि, नसतां ती, मी जणों भोगितों
ध्यानीं मग्न असें; तरीहि विरहव्याधी कसा वाढतो ? " १६

* * *

मागें पाहि वळोनि, हांसतिं शिरोरत्नें, किरीट स्फुरे
श्रीराधामुखचंद्रम्यासि निरखी गोविंद अत्यादरें
मोठ्या कृष्णकटाक्षवीचि उटल्या ! देवोत सौख्या, अहो !
गोपीवृंद न ज्या विलोकि; मुरलीगानींच तल्लीन हो. १७

मुग्धमधुसूदन नामक

तिसरा सर्ग

समाप्त

# सर्ग चवथा



[ **प्रबंध ८ वा**--यमुनातीरावरील कुंजामध्यें असलेल्या **विरहदुःखी** कृष्णास राधेची सखी राधेची कृष्णभेटीविषयीं आतुरता व **कामज्वरसंतप्तता** वर्णन करून सांगते ( श्लोक १-१० ); **प्रबंध ९ वा**-राधिकेची **विरहावस्था** सखी कृष्णास पुनः सांगते ( ११-२३ ); सर्गसमाप्ति शुभेच्छा ( २४ ). ]

मंदप्रवाहा यमुनानदी ही
तीरीं हरी वेतसरम्यगेहीं
जो प्रेमभारें भ्रम-मंद झाला
राधासखी बोललि त्या हरीला. १

* * *

" तव विरह मुकुंदा ! कोण साहील बाला
क्षणभरि तव संगें, ताप जीचा निवाला ?
मदनविशिखपातें कांहिं व्हावी न बाधा
म्हणुनिच तव पायीं काय ही लीन राधा ? २

संताप देति बहु चंदनगंधवीची
अंगास झोंबति जिच्या किरणें शशीचीं
ती कामिनी मलयपर्वतवायुतेंही
नागाधिवास ह्मणुनी विष मानि, पाहीं ! ३

हा आपुल्या हृदयमंदिरिं राहिला जो
संतप्त काम-शर-संघ तया न भाजो,
ऐशा मिषेंचि जणुं रक्षितसे उराला !
स्वीकारि आर्द्र नलिनी-दल ह्याचि ढाला ! ४

शय्या रची कुसुमपूर्ण विलास-धाम
   तन्वी गमे, व्रतचि आचरिते सकाम;
लाभो मुकुंद–परिरंभण–सौख्य काया
   इत्यर्थ घे मदनबाणचि ती निजाया. ५

हे श्यामसुंदर मुकुंद ! किती वदावें ?
   राधामुखाब्जि नयनाश्रु तसे खुलावे
गाळी जणों अमृतबिंदुंसि काय इंदू
   चावे जयास रिपुराहुच शाठ्यसिंधू ! ६

कस्तूरिकेसि बनवूनि सुगंधि शाई
   काढी तुझें मदन–चित्रचि, शेषशायी !
खालीं लिखी मकर; दे नवचूत हातीं.
   वंदीतसे मग सखी तुजला, पहा ती. ७

‘ आल्यें, प्रभो ! शरण मी चरणारविंदा
   प्राणप्रिया ! विमुख होउं नको, मुकुंदा !
हा जाळितो अमृतसिंधुहि इंदु मातें. ’
   ऐसें वदे भिजविते तुज अश्रुपातें. ८

प्रत्यक्ष लाभ तव जाणुनि ती दुराप
   ध्यानांत लीन हरि ! होइ तुझ्या अपाप;
होते सशोक, हसते, खिजते, रडे ते
   जाते इथें, झणिं तिथें, मग शांत होते. ” ९

* * *

हो ! आवडेल रसिकां जयदेव-बोल;
   कल्लोलपंक्ति उठती हृदयांत लोल

| | | |
|---|---|---|
| श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधि यांचे चित्रसंग्रहालयांतील, त्यांचे कृपानुग्रहें | वंदन | कांग्रा-व्हॅलीची चित्रपद्धति १८ वें शतक पूर्वार्ध. औंध चित्रशाळा. |



" आल्यें प्रभो ! शरण मी चरणारविंदा ।
प्राणप्रिया ! विमुख होउं नको, मुकुंदा ! ॥ "

सुश्लोकगोविंद, सर्ग ४

राधासखी निजसखी विरहार्त होतां
जें बोलली हरिस, त्या मन गाइ गीता. १०

*  *  *

" राधेला विपिनासमान गृह हो ! जाळें सखीचक्र तें
श्वासोच्छ्वास तिचे सदाह गमले, ज्वाळाचि दावाग्नितें !
तेथें ही हरिणी, तियेंसि यमसा, कंदर्प हा ताडित.
हा ! दुष्टा मदना ! कसें करिसि हें **शार्दूलविक्रीडित** ? ११

कृष्णा ! तुझी लाभलि नाहिं भेटी
ह्मणोनि राधा मनिं होय कष्टी;
रुळे स्तनीं जो बहुमूल्यहार
तन्वीस तोही अति होइ भार. १२

अंगीं सुगंधी उटि चंदनाची
विलेपिली शीतळ आर्द्र साची
न ती सुखी हो विरहार्त राधा,
शंकी मनीं कीं विषजात बाधा ! १३

पुष्पायुधें पीडित होइ ऐसें
राधा किती टाकितसे उसासे;
उरांत मोठा मदनाग्नि पेटे
ज्वाळा जणों या निघतात, वाटे. १४

नेत्रीं चकाके बहु अश्रुबिंदू
चोहींकडे पाहत रूपसिंधू
अ-नाळ कीं तें नयनाब्ज हाले
पहावयाला तुजला भुकेलें ! १५

अत्यंत कोळया जरि पल्लवांची
प्रत्यक्ष शय्या न तिला दिसेचि
शृंगार सारा दिसतो पसारा;
अंगाररूपी समजे अगारा ! १६

त्वच्चिंतनीं रंगलि सुंदरी ती
ठेवी कपोलीं कर कुंददंती,
भासे कराच्छादित गाल तीचा
संध्यांबरीं बालशशीच साचा. १७

'हरे ! हरे ! माधव धांव. रामा !'
असें तुला आळविते सकामा;
वियोगदुःखें तुझिया मुरारे !
मरेल ! मच्चित्त भयें थरारे. " १८

* * *

राधा-सखी बोललि जें हरीतें
तें गाइलें श्रीजयदेवगीतें
श्रीकृष्णभक्तिप्रद गोड गान
ऐकोनि डोले सहजींच मान. १९

* * *

" रोमांचोद्गम जाहला, थरथरां कांपे, किती विव्हळे,
टाकी दीर्घ उसास, नेत्र मिटते, येतें पुन्हां भोंवळें
ध्याते, ती उठते, उठोनि पळते, क्लांता झणीं मूर्च्छते
स्ववैद्यप्रतिमा ! महाज्वर रसें नाशीं ! जगो ती इथें. २०

तुझ्याच संगें — अमृतें — जगावी,
सुरम्य धन्वंतरि ! ती बघावी,

न तारिशी बा ! जरि राधिकोर
 **उपेन्द्र** ! **वज्राहुति** तूं कठोर ! २१

ही कामज्वर-पीडिता वरतनू, तत्रापि आश्चर्य कीं
 आणी चंदन-चंद्रमा-कमलिनी-चिंताहि मूर्च्छा निकी !
एकांतीं, प्रिय तूंचि शीतलतनू, त्यातें तुला चिंतती,
 ना येशी अजुनीहि ! कैंवि अबला ठेवील बा ! जीव ती ! २२

तव विरह तिला सहे न आधीं
 क्षणभरिही करि पक्ष्मपात आधि,
नव युवति, वियोग–दुःख–नम्रा
 बघुनि न साहिल **पुष्पिताग्र** आम्रा." २३

* * *

इंद्रें वृष्टि करोनि गोकुळजनी आक्रांत जैं मांडिला,
 केलें छत्र गिरीसि, तो प्रलय कीं लीलेंचि ओलांडिला,
चुंबी बल्लव-सुंदरी-गण तया, अत्यंत आनंदला
 तन्मुद्रांकित बाहु गोपहरिचा आम्हांसि होवो भला ! २४

**स्निग्धमाधव नामक**

**चवथा सर्ग**

**समाप्त.**

# सर्ग पांचवा

[**प्रबंध १० वा**–राधिकेची सखी श्रीकृष्णाची विरहावस्था राधेस कळविते, ( श्लोक १-१० ); **प्रबंध ११ वा**–कृष्णकामना पूर्ण करण्याविषयीं राधेस सखी विनविते (११-२३); आशीर्वादयुक्त सर्गसमाप्ति ( २४ ). ]

" सखि ! मम दयितेसि आण, जा जा ,
कळविं तिला विनवूनि हेतु माझा. "
हरिवच परिसोनि, राधिकेसी
चतुर सखी वदली विनीत ऐसी. १

*  *

" राधिके ! कुसुमकोमल बाळे !
कृष्णमानस–विहारि–मराळे !
पीडिला सुमशरें वनमाळी,
थोर त्यासि विरहानल जाळी. २

मंद मंद मलयानिल वाहे,
साह्य त्या करि जणों मदना हें,
गंध सुंदर सुटे सुमनांचा
ताप वाढवि वियोगिजनांचा. ३

चंद्रिका–किरण सेवुनि शीत
येइ कीं मरण मन्मन भीत;
त्यासि पाहुनि, सये ! मज वाटे,
कामिलोक बहुधा उफराटे ! ४

कामबाण पडला जर अंगीं,
शूर वीरहि गदाधर शार्ङ्गी

होत हा विकलकाय अगाई !
धाय धाय रडतो ! नवलाई. ५

गुंजती मधुर त्या भ्रमराली
ऐकतां श्रवणिं अंगुलि घाली.
सोसवे विरह केंवि मनाला !
अश्रुंनीं निशिं भिजे वनमाला. ६

श्रीनिधान, सुखधाम असेंही,
सोडुनी भवन तो वनिं येई ;
भूवरी गडबडां यदुराणा
लोळतो रडत केविलवाणा ! ७

' राधिके ! अवधि कां तुज याया ?
राधिके ! हृदयिं नाहिं न माया ?
राधिके ! रुससि कीं, अपराधें ? '
हांक मारि तुजला हरि, राधे ! " ८

* * *

वर्णिला कविवरें जयदेवें
राधिकाविरह, जो हरि पावे ;
कृष्णलीन मन हें हरपावें,
गोड ऐकुनि जसें हरि-पांवे. ९

* * *

" पूर्वीं जेथ तुझ्यासमेत मदन-श्री-सिद्धि संपादिल्या,
तो तेथेंचि पुन्हां, रति-प्रभु-महा-तीर्थीं निकुंजांतल्या -

राधे ! ध्यात तुला, सदा जपतसे त्वन्नाममंत्रा हरी,
नीवीमोक्ष तसेंचि निर्भरभुजाश्लेषामृतेच्छा धरी. १०

झुळझुळु वनिं लागे वायु वाहावयाला,
उपतटिं यमुनेच्या माधवें वास केला;
युवतिकुचयुगें तीं मर्दुनियां विशालें
तरल कर तयाचे शोभते तेथ झाले ! ११

पृथुलजघन बाळे ! बैसला कृष्ण कुंजीं,
गमत रतिसुखाची मौल्यवान् तीच पुंजी.
झडकरि चतुरे ! जा ! गांठ तो काममूर्ती,
प्रभु तव हृदयींचा जो करी प्रेमपूर्ती. १२

अधरिं मधुर पांवा माधवें वाजवावा,
शशिमुखि ! तव घ्यावें लक्षदां गोड नांवा,
पवनचलित साधा रेणुही तो पुजावा,
तरिहि अरसिके ! त्वां कां न कान्हा भजावा ? १३

सहजिं उडति पक्षी, शब्द हो स्वल्प पानीं,
निकट मदनराणी तूंचि आलीस मानी ;
हरि रचि सुमनांची नीट शय्या निजाया,
चकितनयन लागे वाट, राधे ! पहाया. १४

ह्मणुनि रमणि ! ऐकें, काढिं त्या नूपुरांना,
करिति अमित नादा, कोणि ऐकेल त्या ना ?
वसन तनुवरूनी पांघरूनी निळेंसें
विपुल–तिमिर–कुंजीं जाउं या वेगिं कैसें ! १५

धरि उर वनमाळा श्रीहरीचें, तिथें ती
सखि ! तव तनु तन्वी शोभती गौरकांति;
चल–विहगबलाका–मालिका–युक्त मेघ
तदुपरि दिसशी तूं ही विजेचीच रेघ ! १६

किसलयमय–शय्या–वल्लरी–मंडपांत –
कर सुचिर विहारा, जेथ तो रम्य कांत.
मदननृपतिचा जो दीप्तिमान् रत्नसांठा
वितरिं हरिसि, दे गे ! त्याजला हर्ष मोटा. १७

सखि ! कर वदत्यें तें, जा हरिपार्शि वेगें.
सकळ यदुपतीच्या कामना पूरवीं गे !
हरि तरि अभिमानी, राग मानील मानी,
रजनिहिं सरताहे, हो न हे कालहानी. " १८

* * *

कविवर जयदेवें, सेवकें माधवाच्या
परम सुरस गीता गाइलें गोड वाचा;
मुदितहृदय झाला कृष्ण कारुण्यराशी,
सुकृत बहु म्हणोनी वंदितो ' राम ' त्यासी. १९

* * *

" सखि ! कितिक दे ! सुस्कारें हा, दिशोदिशिं पाहतो;
फिरुनि फिरुनी जाई कुंजीं, सचिंत बसेहि तो
शयन रचितो वेळोवेळीं, बघे बहु दीनसा,
मदनतपनें संतापोनी करी हरि हा असा. २०

राधे ! बोल तुझा खरांशुसह गे ! अस्ताचला लोटला,
कृष्णाच्याहि मनोरथांसह नभीं अंधार हा दाटला,
कोकांच्या करुणस्वरासदृश ही दीर्घाचि मत्प्रार्थना,
तेव्हां मानिनि ! कां विलंब करिशी ? जाते घडी व्यर्थ ना ? २१

भेटाया निघतां तमीं प्रियजना येऊनि, आलिंगुनी,
चुंबूनी, नखिं लेखुनी, निजमनीं कामेंहि उल्हासुनी
किंचित् संभ्रमुनी, रतांत रमुनी, चित्तांत आनंदुनी,
बोलोनी जयिं जाणती पर, तदा वाहे रस–स्वर्धुनी ! २२

सभयचकिता, फेंकी मार्गीं तमोमय दृष्टिला,
हळु हळु सरे वृक्षापाशीं स्वदेहहि कष्टिला,
कशितरि शिरे अंधारीं जो, अनंग भरे उरीं,
सखि ! शशिमुखी ऐशा तूंतें, सभाग्य बघो हरी." २३

* *

राधेच्या वदनारविंदमधुतें सेवी मिलिंदासम,
जो त्रैलोक्य–शिरावरी दिसतसे कीं नीलरत्नोपम,
कंसध्वंसन तोषवी व्रजवधू जो नित्य चेतोरमा,
भूभारा हरितो, असोचि हरि तो सौख्यप्रदाता तुम्हां. २४

**साकांक्षपुंडरीकाक्ष नामक**
**पांचवा सर्ग**
**समाप्त**

# सर्ग सहावा

—— :0: ——

[ **प्रबंध १२ वा**-राधिकेची असहायावस्था सखी कृष्णास सांगते ( श्लोक १-१२ ); सर्गोपसंहार श्लोक ( १३ ). ]

अनुरक्ता हरिवरि जरि, परि असमर्था, म्हणोनि आली न,
आली नवदयितेची, कळवी तें हरिसि जो स्मरालीन. १

*　　　*　　　*

" यदुराय ! हरे ! तुझी सखी
　　प्रियराधा नच ती दिसे सुखी,
मदनें छळिलें जिला अती,
　　कृतसंकेत लतागृहांत ती. २

हुडके तुजलागिं ती, पहा !
　　मृगनेत्रा बघते दिशा दहा,
मधुरा अधरामृतासवा
　　पिउनी सांपडशी न, केशवा ! ३

तुजसन्निध यावया निघे,
　　रजनीनील असाचि वेष घे,
पडते, न चलेचि बालिका,
　　हृदिं वाहे नयनाश्रु-मालिका ! ४

कमलोदरिंचीं बिसें बरीं
　　वलयें कोमल घातलीं करीं;

मरणोन्मुख जाहली परी
 सुरता चिंतुनि ती जगे परी. ५

बहुवार विलास–भूषणा
 निरखोनी बहु निंदि आपणा;
वदते ' बघ, मीच तो हरी '
 भ्रम पावे ललना परोपरी. ६

' ठरल्या स्थळिं कां गडे ! न ये
 अजुनि श्रीधर सांवळा ? सये !
पळही गमतें जसें युग ! '
 सखिला बोलतसे असें मग. ७

तिमिरा घनदाट पाहुनी,
 जणुं आला हरि हेंचि ये मनीं !
पसरी भुज, त्यासि आकळी,
 बहु चुंबी युवती तया खुळी ! ८

' जरिही अति काल लोटला
 तरि कान्हा मज कां न भेटला ? '
मनिंची मग भीड टाकुनी
 रमणीं शोक करी निशीं दिनीं. " ९

* * *

विरहें जशि राधिका भरे,
 वदला तें जयदेव सुस्वरें;
बहु हृष्ट करील नित्य ती
 रसवंती रसिकां सरस्वती. १०

* * *

श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधि यांचे चित्रसंग्रहालयांतील, त्यांचे कृपानुज्ञेनें — **वासकसज्जिका** — कांग्रार्न्हेली चित्रपद्धति १८ वें शतक पूर्वार्ध. औंध चित्रशाळा.



अंभोजाक्षी पुलकिततनू ती तुझा ध्यास घेई ।
  शृंगाराच्या जलनिधिमधें माधवा! मग्न होई ॥
बाला बोले विकळहृदया, कांहिं सीत्कारही ते ।
  मंदा कांता मदन-दहनें; हे हरी! तार तीतें ॥ १२ ॥ सुश्लोकगोविंद, सर्ग ६

“ अंभोजाक्षी पुलकित–तनू ती तुझा ध्यास घेई,
शृंगाराच्या जलनिधिमधें, माधवा ! मग्न होई
बाला बोले विकल–हृदया, काढि सीत्कारही ते,
**मंदा क्रांता** मदन-दहनें, हे हरी ! तार तीतें. ११

वाजे पान जरी, तरी तिज गमे कीं तूंच आलास रे !
हर्षे भूषविते स्वतांस, रचिते शय्येसि ती सत्वरें ;
पाहे ती मृगलोचना चहुंकडे, ध्याते तुला कामिनी;
भेटे ना तुज ती, तरी न युवती वांचेल ही यामिनी !” १२

*           *           *

‘ भोगी कृष्ण जिथें फिरे निशिं, असा हा वृक्ष औदुंबर;
नंदाचें गृह तें ! रहा चल ! तिथें, अंधारलें अंबर. ’
राधेचें वच हें कथी पथिक तो नंदासि, तेव्हां हरी
बोले ‘ हो ! नच राहिलां, बहु भलें ! ’ ही धन्य तद्वैखरी. १३

**सोत्कंठवैकुंठ नामक**
**सहावा सर्ग**
**समाप्त**

# सर्ग सातवा



[ **प्रबंध १३ वा** श्रीकृष्णभेटीविषया आर्त झालेली राधा, अजून तो कां येत नाहीं, म्हणून खिन्न होऊन शोक करते ( १-१२ ); **प्रबंध १४ वा**-कृष्णास बोलावण्याकरितां गेलेली दूती एकटीच परत आलेली पाहून, राधेस वाटतें कीं, तो दुसरीकडे गोपीसह रममाण झाला असावा. म्हणून विषादानें त्या कृष्ण-गोपींचा विहार मनामध्यें कल्पून ती सखीस म्हणते ( १३-२२ ); **प्रबंध १५ वा**-विरहार्त राधा पुनः त्याच कृष्णगोपींच्या काल्पनिक विहारांचें वर्णन करते ( २२-३१ ); विफलयत्न अतएव कष्टी झालेल्या दूतीस पुनः राधा म्हणते(३४); **प्रबंध १६ वा**-कृष्णसंगीं रमलेल्या गोपींचें भाग्यवर्णन राधा करते,( ३५-४२ ); कामार्त राधिकेचे उद्गार ( ४४-४६ ) ; सर्गान्तीं ईशवंदन. ( ४७ ).]

नुरवि तिमिरा मार्गी, येती जिथें अभिसारिका;
म्हणुनिच जया लागे पापें कलंक शिरीं निका !
पसरलि नभीं पूर्णेंदूची प्रभा परमोज्ज्वला;
गमत जणु तो दिग्देवीच्या मुखावरला टिळा ! १

पाहोनियां उदित तें नभिं चंद्रबिंब,
‘ याया करी अजुनि माधव कां विलंब ? ’
दुःखाकुला करितसे अशि शोक राधा;
बाधा मनोभवहि दे तिजसी अगाधा. २

* * *

“ शरण मी कवणासि रिघूं तरी ?
मरणही पुरवे मज अंतरीं !

किति बघूं हरिची अजि वाट ती ?
        अहह ! या सखया रिपु वाटती ! ३

‘ प्रियतमे ! वनिं येइन मी. ’ असें
        कळवुनी घननीळ न येतसे.
विफल हें अनुरूपहि यौवन !
        सुख असें न दिसे, जरि नाथ न. ४

न गणुनी रजनी, विपिनीं तमीं
        रमणसंगमनोत्सुक येइं मी;
मदन दुष्ट शरें कठिनोचित
        अदय या हृदया मम टोंचित ! ५

वपु गमे मम निष्फळ भार हें;
        विरह–दाह न हा मजला सहे;
हृदयिं मोहभरें बहु यातना;
        मजसि कां यम कायम नेत ना ? ६

ऋतु वसंत, सुखावह हे निशा,
        दुखविती सुमगंधवती दिशा;
कवण भाग्यवती रमणी अती,
        मम मतें, रमते हरिसंगतीं. ७

बहु अलंकृति लेवुनियां वरी
        सजविली तनु म्यां जरि साजरी;
पुरविना हरि तो परि कामना;
        क्षणहि हें न सहे मुळिं मन्मना ! ८

मजसि कोमल पाहुनियां वरी,
कुसुममाळहि घाय हृदीं करी !
असति बाण जरी मृदु ते पहा,
अगइ ! थोर कठोर अनंग हा ! ९

‘ हरि मिळेल कुठें मज ? ’ या मतीं
विपिनिं मी भ्रमलें, श्रमलें अती.
मनिं असें, कधिं माधव पाहिन ?
परि हरी लहरी स्मरतोहि न ! ” १०

* * *

शरण जो हरिच्या चरणांबुजीं
वदत तो कविता जयदेव जी –
मधुर कोमल ती युवतीच कीं
हृदिं सती वसती करुं मंचकीं ! ११

* * *

“ तो कोण्या कामिनीशीं विहरत ? अथवा रंगला गोपमित्रीं ?
किंवा वृंदावनाच्या भंवतिं फिरतसे, नेणुनी मार्ग रात्रीं ?
कीं माझ्या चिंतनानें श्रमुनि मम सखा मार्ग चालूं शकेना ?
नेणें कांहींच मी तें, अजुनिहि हरि कां वल्लरीकुंजिं ये ना ! ” १२

आली सखी परि न माधव तीजसंगें
दुःखाकुला हतमती नच कांहिं सांगे;
राधेसि वाटत हरी रतला दुजीसीं
प्रत्यक्ष पाहत जणों वदलीहि तैसी. १३

* * *

" कृष्णसंगिं रमली व्रजनारी
सुंदरी कवण ती सुकुमारी ?
वाटते मजसि कीं निरखूनी,
भाग्य थोरचि तिचें मजहूनी ! १४

वेष पंचशर-युद्ध कराया
योग्य लेइलि गमे स्मरजाया;
नील केश, कुरळे रुळणारे,
पुष्पगुच्छ, सुटुनी गळणारे ! १५

श्रीधरासि परिरंभण देई;
हर्ष थोर हृदयांत न माई.
कुंभ–तुल्य–कुच–युग्म–शिरीं तो
हार चंचल विहार करीतो. १६

आननेन्दुवरि कुंतल काळे
मेघसे पसरिती निज जाळें
सेवुनी मधुसुधा अधरींची
होइ लीन; तिज भान नुरेची ! १७

कुंडलें तरल लागतिं गालीं,
मोहिला हरि तिनें वनमाली;
चंचला युवति ती स्थिर नाहीं,
मंजुला घुमतसे रशनाही. १८

प्राणवल्लभ बघे बहुमानें,
लज्जिता स्मित करी प्रणयानें;
मानिनी सुरतिं ती रमतांना
कूजनें रिझविते विहगांना ! १९

हर्षिता बहुत अंतारें नारी;
रोमहर्ष उगवेहि शरीरीं,
श्वास त्या श्रमभरें बहु टाकी
पोहते मदन-केलि-तटाकीं ! २०

घर्मबिंदु शरदिंदुमुखीतें
मौक्तिकासमचि शोभति कीं ते !
क्रीडते हृदयिं जी रमणाचे,
धीर ती स्मररणांगणिं नाचे." २१

अंबुजाक्ष-मधुसूदन-केली
गावया सुकविबुद्धि भुकेली,
कृष्णभक्त-जयदेव-कवीश-
गीत हें उरविना अघलेश. २२

* * *

"मुखकमल हरीचें म्लान जें मद्वियोगें,
तदुपम विधु मातें सौख्य हा देउं लागे,
परि मदन-सखा हा निर्मितो दुःखवेग
अदय हृदयिं माझ्या; सोसवेना, सये ग ! २३

शृंगारमूर्ति जलजानन हा मुरारी
तीरावरीं उपवनीं रमला विहारीं;
पूर्णेंदुरम्य रजनी नयनाभिरामा,
ऐशा क्षणीं दवडि कोण सकाम रामा ? २४

प्रियतम रमणीतें बांधुनी बाहुपाशीं,
मधुमय अधरासी चुंबितो प्रेमराशी;
पुलकिततनु लावी कस्तुरी गौर गाला,
विधुवरि जणुं काढी कृष्ण काळ्या मृगाला ! २५

भुलविति तरुणांना केश जे सुंदरींचे,
रतिमदन–मृगांचें होत तें रान साचें !
कुरबकसुम तिच्या कुंतलीं कृष्ण घाली
दिसत घनसमूहीं जेविं विद्युत् निघाली ! २६

स्तनयुगुल निळें जें कस्तुरीनें सुवासी,
शशिसम नखचिन्हें शोभतें तें तियेसी;
वरि मणिमयमाळा अर्पि तो भाग्यशाली,
जशि गगनिं विशालीं घातली तारकाली ! २७

रुचिर मृदुल बाहू शीतलस्पर्शदायी
जणुं करकमलांचे वाटती देंठ, बाई !
मरकत–वलयांनीं भूषवी कामिनीला,
गमतिं मधुकरांच्या पंक्ति त्या काय नीला ! २८

पृथुलजघनसद्मीं कामकांता रहात,
मदननृपहि बैसे त्याचि सिंहासनांत,
हरि वसन तयातें पांघरी आदरें तें,
वरि मणिमय बांधी मेखला-तोरणातें ! २९

किसलयसुकुमारा कामिनीच्या पदांस
उचलुनि हृदिं घेई जेथ पद्मानिवास;
प्रियकर हरि त्यांतें रंगवी लालरंगीं;
नखमणि रमवीती कामुका अंतरंगीं. ३०

कमलनयन रामा मूर्त श्रृंगारराणी
तिजसह रमला त्या काननीं शार्ङ्गपाणी
अनुज हलधराचा तो सये ! चोर आहे !
उगिचाचि इतुकें या कुंजिं मी बैसलें हें !” ३१

सुरस रुचिर लीला माधवाची वदावी,
कलिमलिन मना जी शोधुनि मोद दावी.
हरिगुण जयदेवें गाइले भक्तिभावें;
परिसुनि रसिकें तें अंतरीं तृप्त व्हावें. ३२

पाहूनियां व्यर्थ निज प्रयत्न,
विषण्ण झालें हृदिं दूतिरत्न;
राधाच लागे तिज शांतवाया
स्वयेंचि होती जरि आर्तकाया. ३३

* * *

" कष्टी होउं नको, सये ! कितव तो येथें न आला जरी,
धूर्ताच्या बहु वल्लभा असति गे ! स्वच्छंद रंगे हरी;
माझें चित्त फुटे पहा ! स्मरभरें, सोत्कंठ झालें, गडे !
कांताचे गुण ओढिती म्हणुनि तें धांवे स्वयें त्याकडे ! ३४

शृंगारगुच्छावरला मिलिंद
ज्या कामिनीला रमवी मुकुंद,
तिचें विकासे वदनारविंद
हर्षांबुधीला भर ये अमंद. ३५

अनिलचंचल उत्पल जांभळें
तदुपमें नयनें बघि तो जिला,
तिजसि तापवि काय कधीं, सये !
कमलिनी-दल-मंचक योजिला ! ३६

विकसितांबुजरम्य मुखें जिचा
अधर चुंबितसे मुरलीधर,

तिजसि टोंचति काय, बये ! कधीं
    मदनसायक ते जरि दुर्धर ? ३७

मधुर कोमल शब्द सुधेसम
    वदुनि माधव जीप्रति मोहितो
वद, सये ! कधिं दैववतीस त्या
    करिल कीं मलयानिल दाह तो ? ३८

कमलसुंदर बाहुपदद्वयें
    दृढ जिला कवळी सखये ! हरी,
नच कधीं तिजला अति शीतळें
    निजकरें रजनीपति संहरी ! ३९

सजल वारिधरासम सांवळा
    हरि जियेसह घालवि यामिनी,
सुतनु ! ती हृदयीं विरहानलें
    कधिंहि दग्ध न होइल कामिनी. ४०

जलरुहानन माधव आपुलें
    रुचिर अंबर जीवरि पांघरी,
तिजसि काय तिच्या सहचारिणी
    खिजवितीं कटु बोलुनि वैखरी ? ४१

सकरुणें भुवनीं पुरुषोत्तमें
    रमविली, सखि ! जी व्रजसुंदरी,
वद, असे कधिं ती प्रमदोत्तमा
    पळभरी तरि दुःखित अंतरीं ? ” ४२

* * *

श्रवणरम्य वदे जयदेवजी
रसिकवृंदमना रिझवी गुणें.
सतत 'राम'-मनीं वस, वामना !
किमपि नाहिंच हो ! मग तें उणें. ४३

* * *

" कृपादृष्टीं पाहें ! मलयजसमीरा ! मजवरी
अनंगाच्या मित्रा ! धरिं सरलता ना ! क्षणभरी;
जरी तेंही नोहे, पळहि तरि भेटो ! मज हरी,
जगत्प्राणा ! प्राणां मम मगाचि तूं सत्वर हरीं ! ४४

रिपुसम सखी चित्ता भासे, हिमानिल अग्निसा,
विषसम गमे इंदुज्योत्स्ना, सये ! मम मानसा,
परि हृदय हें कृष्णीं तृष्णा धरीं, जरि तो खर;
स्मर कुटिल हा वामाक्षींचा निरंकुश कुंजर ! ४५

मज मलयसमीरा ! जाच तूं देत जाच !
झणिं मम मदना ना ! प्राणही घे तसाच;
गृह मज नलगे तें; हे कृतान्तस्वसे ! ग !
भिजविं मज जळीं तूं, होउं दे थंड अंग ! " ४६

* * *

हर्षानें वंदितांना अमरसहित तो इंद्र त्या पद्मनाभा,
पादाब्जीं सेन्द्रनीलें मणिमयमुकुटें अर्पि इंदीवराभा,
जेथें गंगांबु शोभे, मधुर मधु जणों काय नीलोत्पलाचें,
त्या श्रीगोविंदपादां नमन मम सदा देह-सद्बुद्धि-वाचें. ४७

**नागरनारायण नामक**

**सातवा सर्ग**

**समाप्त**

श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधि यांचे चित्रसंग्रहालयांतील, त्यांचे कृपानुज्ञेनें } खंडिता { जयपूर चित्रपद्धति १८ वें शतक. भौम चित्रशाळा.



प्रभातीं येवोनी हरि करि तिची पायधरणी ।
परंतु क्रोधें ती परुष वदली त्यासि तरुणी ॥

सुश्लोकगोविंद, सर्ग ८

# सर्ग आठवा



[ **प्रबंध १७ वा**-राधिकेस भेटण्यास्तव श्रीकृष्ण प्रभातकालीं आला असतां, त्याचेवर गतरात्रींचीं सुरतोपभोगचिन्हें पाहून मत्सरयुक्त राधा क्रोधानें त्यास बोलते ( श्लोक १--११ ); सर्गान्तीं शुभयाचना ( १२ ). ]

तिच्या स्कंधींचा त्या निशिं मदन-मुंजा न उठला,
पडावा राधेला पळहि मग आराम कुठला ?
प्रभातीं येवोनी हरि करि तिची पायधरणी,
परंतु क्रोधें ही परुष वदली त्यासि तरुणी. १

*　　　*　　　*

" अरे ! जा जा ! धूर्ता ! कठिनहृदया माधव हरी !
तिच्या लागें पाठीं, सुखवुनि तुला जी प्रिय करी;
कसा यांतें देशी रुचिरपण धात्या ! अनिपुणा ?
खळांना या देवा ! शिव शिव ! शिवेनाहि करुणा ! २

अनिद्रेनें नेत्रें अरुण, अलसें जाहलिं जड;
भलें झालें कोण्या सवतिवरलें प्रेम उघड !
घडे जीच्या नादें निशिदिनिं तुला जागरण रे !
तिच्या लागें पायां ! मजसि नमणें माधव ! पुरें. ३

तुझी ती वामाक्षी निजनयनिं जें काजळ भरी,
हरी ! तें चुंबोनी मलिनपण तूं घेशि अधरीं ;
अहो ! शोभे तुझा अधर तनुसा कृष्णचि बरा !
वराला जी ऐसें नटवि सटवी तीसचि धरा ! ४

स्मराच्या संग्रामीं प्रखर नखशस्त्रें युवतिनें
क्षतें हीं जीं केलीं तव तनुवरी निष्ठुर मनें,
दिली वाटे, कृष्णा ! तुज तरुणिनें युद्धविजयीं –
प्रशंसा हे लेखी, मरकतिं जशी कांचनमयी. ५

पदांतें नारीच्या कवळुनि हृदीं रंगविशि रे !
मला वाटे तें कीं, मदन-तरुचे नूतन तुरे ;
अगा कृष्णा ! देखें तव हृदयिंचे लाल वण ते ;
शिरीं घे जा ! आतां तिजसिच; भलें नाच ह्मणतें ! ६

तुझ्या जे हे दंतव्रण अरुण, ओष्ठांवरि नवे,
पहा त्यांतें, देतें जरि तुजसि तें दर्पण हवें !
खुपेना तें तूतें परि मज उरीं खोल खणतें !
कथा प्रेमाच्या तूं कथिसि मजला, व्यर्थ पण तें ! ७

असो अंगें काळा, परि अधिक काळा हृदयिं रे !
मला वाटे कृष्णा ! तुजहुनिहि हालाहल बरें.
तुझ्या छंदें झाल्यें मदनशरसंतप्त विकळा,
कसा या (!) तूं माझा फसवुनि असा कापिशि गळा ! ८

वनीं कृष्णव्याघ्रा ! फिरासि कवळायासि हरिणी,–
सुशीला रंभोरू विकचनयना मुग्ध तरुणी;
हरी ! येथें कैचें अवघड तुला ? जें शिशुपणीं
तुवां रक्षःस्त्रीही वधिलि सहजीं शोषुनि क्षणीं !" ९

* * *

असें बोले राधा फटाविलि हरीनें प्रियकरें,
हरीच्या चित्ता तें परि सुखचि दे आंतुनि खरें.

श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधि यांचे चित्रसंग्रहालयांतील, त्यांचे कृपानुग्रहें — **खंडिता** — कांग्राशैली चित्रपद्धति १८ वें शतक पूर्वार्ध. औंध चित्रशाळा.



प्रभातीं येवोनी हरि करि तिची पायधरणी। परंतु क्रोधें ही परुष वदली त्यांसि तरुणी ॥
" अरे जा जा! धूर्ता कठिणहृदया! माधव हरी!। जिच्या लागें पाठीं, झुरवुनि तुला जी प्रिय करी
घडे जीच्या नादें निशिदिनिं तुला जागरण रे!। तिच्या लागें पायां; मजसि नमणें माधव! पुरें!

सुश्लोकगोविंद, सर्ग ८

अहो ! ऐका प्रेमें सुकविवच पीयूषमधुर;
मिळेना जें स्वर्गी, सुलभ करि तें तोचि चतुर. १०

* * *

“ प्रियेच्या पायांचा हृदयिं जडला जो अरुणिमा,
दिसे येथें झाली प्रकट जणुं ती प्रेमसुषमा;
तुला या पाहोनी मम्हिह मनिं लज्जा उगवली,
जरी भंगोनी त्वां प्रणय मज पीडाच्चि दिधली. ” ११

* * *

संपे रात्र जरी, तरि प्रियकथा ज्यांच्या न त्या संपती,
आलीं तीं उठुनी प्रभातसमयीं राधाहरी दंपती;
राधांगीं पिंवळे, निजांगिंहि निळे वस्त्रा बघे, लाजला;
पाहे जो दयितेसि, हांसति सख्या, तो कृष्ण पावो मला! १२

**विलक्षलक्ष्मीपति नामक**
**आठवा सर्ग**
**समाप्त**

# सर्ग नववा

—

[ **प्रबंध १८ वा**-राधिकेस तिची सखी सांत्वनपर बोलते व **माधवासह रममाण होण्यास्तव** आग्रह करते ( श्लोक १-११ ); सखी राधिकेस आणखी सांगते ( १२ ) ; सर्गांतीं शुभकामना ( १३ ) ]

अनंगानें पोळे, जळ भरुनि डोळे, उरिं गळे,
मनीं चिंता घोळे, रतिमधुर पोळें नच मिळे !
अशा दुःखें लोळे; युवतिमन कोळें तळमळे;
सखीच्या बोलांनीं परि अमळ राधा विरघळे. १

*　　　*

वदे ती सखी, " राधिके ! टाक राग.
मनीं आदरें मान त्या श्रीधरा, ग !
स्वयें पातला कांत कां लोटतीस ?
सये ! हें न येई मुळीं मन्मतीस. २

निशीं वायु वाहे कसा चैत्रमासीं !
कशा चांदण्या खेळती चंद्रम्याशीं !
लतामंडपीं गांठ कृष्णासि रातीं;
गडे ! लूट तेथें सुखाच्या पराती ! ३

मधुर बाइ ! असे मधुमास हा,
रजनिनाथहि रम्य दिसे निशीं;
विपिनिं माधव येइल त्यासवें
रमुनि, मानिनि ! तूं सुख सेविशी. ४

सुरस तालफलाहुनि थोरले
कनककुंभसमान पयोधर,
विफल का करणार तयां खुळे!
हरिवरी रुसुनी रजनीभर? ५

फिरुनि सांगतसें तुज एकदां,
कितिकदां वदलें असलें जरी;
मदन-सुंदर माधवजीवरी
रुसुं नये सखये रतिमंजरी! ६

झुरसि कामिनि! कां मनिं तूं अशी?
विकल तूं सखये! रडतीस कां?
सहचरी तव, वारिजलोचने!
सकळही तुज हांसति बायका! ७

कुमुदिनी-दल-शीतल कोमल
शयनिं वल्लभ तो, हरिणेक्षणे!
बघुनियां कर सार्थक लोचनां,
रडुं नकोस मुळींच, सुलक्षणे! ८

न धरिं अग्निसमानचि खेद हा
सुमुखि! पोळितसे वदनांबुज.
हरि असे तुजसाठिंच उत्सुक,
हृदयिंचें तुज मी वदतें गुज. ९

जवळ येउनियां बघुनी तुला—
मधुर बोलुनि तो रमवील गे!

करिशि कां मनिं तूं बहु काळजी ?
सुदति ! हास बघूं ? सखये ! उगें." १०

* * *

भुवनसुंदर माधव-राधिका–
चरित गात असे जयदेव जें,
श्रुतिपुटें पिउनी रससार तें,
रसिकमानसहंस तया भजे. ११

* * *

" तो बोले स्निग्ध, राधे ! वच परुष तुझें; नम्र तो, धीट तूं ही;
तो प्रेमी, द्वेषिणी तूं; वदन बघत तो, तूं अशी वक्र, पाहीं;
तेव्हां हें योग्य कीं, जें विषसम ह्मणसी चंदना, सूर्य चंद्रा;
क्रीडा पीडाच्चि भासे, हिमहि दहनसें; काय ही कामतंद्रा ?" १२

* * *

नारींना भुलवी, शिरांसि डुलवी, तेथें फुलें हालवी,
स्तब्धांही वळवी, मुदश्रु गळवी, खेदासही घालवी;
भ्याले जे सुरसंघ दानवभयें तद्दुःख ना दे उरों,
तो हा माधववेणुनाद तुमचें कल्याण मोदें करो ! १३

**मुग्धमुकुंदवदन नामक**
**नववा सर्ग**
**समाप्त**

# सर्ग दहावा

[ **प्रबंध १९ वा**-रात्रौ श्रीकृष्ण राधिकेप्रत येऊन तिचा अनुनय करतो व तिचा रोष घालवितो ( श्लोक १-९ ); अनुनय पुढें चालू ( ११-१६ ); सर्ग-समाप्तीस कल्याणेच्छा ( १७ ). ]

मदनविकळा रात्रीं राधा मनीं अनुरागिणी
बहुत पसरी श्वासज्वाळा, जशा विष नागिणी,
प्रियकर हरी हर्षें तीतें सगद्गद बोलला;
युवति बघते लाजोनीयां सखीमुख कोमला. १

*        *        *

" सुशीले ! अव्यंगे ! तव वदन हें निर्मल शशी,
प्रिये ! नेत्रज्योत्स्ने ! मजवरि वृथा कोप करिशी.
स्मराग्नीनें माझें हृदय जळतें, धैर्य पळतें,
मुखाब्जींचें राधे ! मधु तरि मला पाज पळ तें ! २

सुहास्ये ! बिंबौष्ठी ! वदसि मज तूं अल्पहि गिरा –
प्रभा दंतांची ती, सुदति ! नुरवी भीतितिमिरा.
चकोरी मद्दृष्टी; इस भुलवुनी त्वन्मुखशशी –
वदे प्रेमें ' पी गे ! मदधरसुधा ही मधुरशी. ' ३

प्रिये ! राधे ! क्रुद्धा जरि अससि तूं स्वल्पहि खरी
मला दंडावें त्वां, प्रखरनखिं घायाळहि करीं.
भुजांनीं बांधोनी सुदृढ मज तूं घाल सुचिर,
करीं दंताघातां, कर इतरही जें सुखकर. ४

विभूषा तूं माझी, अससि सखये ! प्राणहि मम ;
भवाब्धीमध्यें या मम अससि तूं रत्न परम.
सदा संतुष्टा तूं मजवरि असावीस ह्मणुनी,
अहोरात्रीं राधे ! झटत असतों मी तनुमनीं. ५

स्वभावें जें नीलोत्पलसम निळें लोचन तव
प्रिये ! रोषें झालें अरुण, जणुं रक्तांबुज नव;
तया राधे ! लाली मधु पिउनियां येइल जर,
मनोज्ञे ! मानांधे ! तरिच तव शोभेल नजर ! ६

प्रसन्ना हो, राधे ! मधुर वद कीं, लाजविं पिका;
तुझ्या खेळावी ही कुचकलशिं गे ! हारलतिका ;
हलावी ही कांची, तव पृथुनितंबावरि सये !
स्वघोषानें सांगो चतुर मदनाज्ञा, रमविं, ये ! ७

प्रभा ज्या पायांची स्थलकमलशोभेहुनि बरी,
बघोनी जें डोळां, उठति हृदयानंदलहरी,
प्रिये ! ज्याच्या योगें रतिहि खुलते तें तव पद
करूं ना मी त्यातें सुरुचिररसें रंगित ? वद. ८

तुझीं पादांभोजें स्मरगरळही नाशितिं क्षणीं,
सुरम्यें तीं माथां मम लवकरी ठेविं, रमणी !
हृदुद्यानीं माझ्या, सुमुखि ! भडके कामदव हा
पदच्छत्रें, राधे ! शमविं तरि तो, सुंदरि ! पहा. ” ९

* * *

असें त्या राधेला मुरलिधर बोले बहु भलें,
प्रियेच्या तें कर्णीं वच मधुर पीयूष गमलें,

रमे ज्याच्या छंदें सकल-रमणी-कोमल-मन
अहो ! गा हो ! तें, हो सुखद जयदेवैकवचन. १०

* * *

“ श्रोणी थोर, तसे घनस्तनहि हे ज्या शोभवीती तुला,
त्या त्वां मद्हृदयप्रदेश सगळा व्यापीयला आंतला;
तेथें कोणि न अन्य धन्य शिरतो एका अनंगाविना !
शंका मानिनि ! मानितीस कसली ? दे देवि ! आलिंगना. ११

क्रुद्धे ! मुग्धे ! प्रखरदशने ! क्रूर हो ! दंश अंग.
दोर्वल्लींनीं कवळुनि, कुचें पीडिशी कीं न, सांग.
चंडि ! प्रेम प्रकट कर कीं एकदां, तूंचि थारा;
मेलों मेलों ! अहह ! मदनें ओढिलें प्राणसारा ! १२

भ्रूवल्ली तव गे ! अघोर कुटिला, प्रत्यक्ष नागीण ही,
फूत्कारें तरुणांसि मोहवि विषें, शोषील ती प्राणही;
आहे सुंदरि ! सिद्धमंत्र जवळीं तत्काळ मोहापह –
तो हा ओष्ठ तुझा, जयांतिल सुधा नाशी विषें दुःसह. १३

टाकीं मौन गडे ! वृथाचि धरलें, तूं बोल गे ! सुस्वर,
दृष्टीनें मम ताप नाशिं, रुससी कां देवि ! माझ्यावर ?
आलों भामिनि ! मी त्वदर्थ, हृदयीं स्नेहा धरूनी स्वयें,
त्यातें स्वागत हें असें उचित कीं ? तूं सांग आतां, सये ! १४

राधे ! बंधूक–पुष्पप्रभ अधर तुझा, नेत्र नीलाब्ज भासे,
गालीं स्नेहें मधूकद्युतिहि धरियली, कुंदसे दंत खासे;
अव्यंगा नासिका ही, जणुं तिलकलिका, उन्नता गौररंगा;
प्रायः पुष्पायुधानें तव मुख नमिलें, जो करी विश्वभंगा ! १५

सुदृक् तव मदालसा, बहु मनोरमा चालशी,
मुखेंदुमति ! ऊरु हे दिसत थोर रंभा जशी;
रतीं अति कलावती, भृकुटि चित्ररेखेपरी,
प्रिये ! सकळ अप्सरा, तुजमधेंचि पृथ्वीवरी !" १२

*   *   *

कुंभीं आकाळिलें, रणीं कुवलयापीडासि मर्दावया,
राधापीनपयोधरस्मृति कशी व्हावी न कृष्णा तया ?
भ्याला वारण, मारिला यदुवरें तैं 'जिंकिलें ! जिंकिलें !'—
हा कोलाहल जाहला अरिजनीं; देवो हरी मंगलें ! १७

**चतुरचतुर्भुज नामक**
**दहावा सर्ग**
**समाप्त**

# सर्ग अकरावा

—— :0: ——

[ **प्रबंध २० वा**-राधेस सखी श्रीकृष्णासह रममाण होण्यास्तव त्वरा करायला पुनः सांगते ( श्लोक १-१० ); सखीकृत कृष्णस्थितिवर्णन (१२); **अभि**सारिका व रात्रीचा अंधकार यांचें वर्णन ( १३-१४ ); **प्रबंध २१ वा-कुंजद्वारीं** उभ्या असलेल्या प्रियकरास पाहून लज्जित झालेल्या राधेस सखी **सांगते** (१६-२२); सखी पुन्हां सांगते ( २४ ); **प्रबंध २२ वा**- श्रीकृष्णवर्णन (२६ ते ३४ ); भक्तकल्याणकारी ईश्वराचें स्मरण करून सर्गसमाप्ति ( ३७ ). ]

बहु प्रार्थोनीही लव न दमला, मात्र रमला,
हरी तो राधेच्या वदनकमला भानु गमला !
प्रमोदें अन्योन्या रमणयुवती ते सजविती,
जरी रूपें होतीं मदनरतिंतेंही रिझवितीं ! १

*　　　*　　　*

संध्येतें गांठिलें सूर्यें कुंजशय्येसि केशवें;
राधा ऐके सखीवाणी, आणी सानंद आंसवें . २

“ सये ! मुकुंदवल्लभे ! मनोरमे ! स्मिताननें !
विलोचनांबुजें तुझीं कुरंगगर्वमोचनें;
असे नितांतकांत तो लतावितानमंडपीं,
तयासि भेट जा, सये ! सुधाधरा उदंड पी ! ३

तुझें पदाब्ज वंदिलें मुरारिनें अनेकदा,
वदेहि कांत मंजु मंजु, रंजवी तुला सदा;
मुकुंद वल्लरीगृहीं असे तरंगिणी-तटीं
तिथेंचि जा प्रियाकडे ! मिळो हरीसि गोरटी . ४

धनस्तनी नितंबिनी, मतंगमंदगामिनी
विलासिनी सुहासिनी सये ! मुकुंदकामिनी !
तया वनांत जा झणीं, रमावयासि साजणी !
घुमोत राजहंससे विलोल मेखलामणी . ५

सये ! न ऐकिलीस काय कृष्णवेणु मंजुळा ?
कुरंगलोचनामनासि मोह घालि कोमळा
' विरोध सोड अंगने ! ' असे स्मरोक्त बोल ते
कळों झणोनि कोकिळाहि तेंच तेंच बोलते ! ६

अमंद गंधयुक्त वायु डोलवीत वल्लरी,
स्वपल्लवासि हालवूनि बोलवीति सत्वरीं
क्षणांत टाक सर्पसा विलंब हा नितंबिनि !
तुझेंचि भाग्य थोर बाइ ! अंबुदाभचुंबिनि ! ७

विशाल हेमकुंभसे तुझे सये ! पयोधर,
करीत अंबुधारसा विहार हार त्यांवर ;
तयांसि कंप देतसे अनंग काय वायुसा ?
विचार हेतु, सांगतील ' कृष्ण-संग-लालसा ! ' ८

अनंगयुद्ध खेळण्यासि सज्ज होइ अंगना,
असेंहि वृत्त पोंचलेंचि या तुझ्या सखीजना,
प्रचंडघोष घांटिका घुमोत दुंदुभिध्वनी !
सलज्ज होशि कां अशी ? उशीर होइ भामिनि ! ९

नखें अनंगशस्त्रतुल्य ज्या करासि साजती,
धरूनि त्या करें सखीस, तूंहि चाल आज ती;

श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधि यांचे चित्रसंग्रहालयांतील, त्यांचे कृपानुज्ञेनें — अभिसारिका — जयपूर चित्रपद्धति १८ वें शतक. औंध चित्रशाळा.



काश्मीरगौर तनु लेवुनि रत्नकांची । रेघेसमान दिसते अभिसारिकांची ॥
अंधार हाचि निकषोपल भासला गे । त्यांचें जणूं प्रणयहेम कसास लागे ॥

सुश्लोकगोविंद, सर्ग ११

निनाद रत्नकंकणें तुझीं करोत, सुंदरि !
अनंगतंद्रिता प्रियासि ऊठवोत मंदिरीं!" १०

* * *

ऐसें श्रीजयदेव वर्णन करी, जें ती सखी बोलली
तें कंठीं धरितील भक्त हरिचे, तैशी न हारावली ;
वामाक्षी-करपद्महीं न सजतें तैसें तयांच्या गळां !
नाहीं भक्तिरसाहुनी त्रिभुवनीं शृंगारही आगळा ! ११

* * *

"'मातें पाहिल कीं ? वदेल मधु कीं ! आश्लेष देईल कीं ?
येवोनी सखि ! ती रमेल मशिं कीं ?' ही त्यास चिंता निकी;
ध्यानीं कुंजतमीं बघे तुज हरी, कांपे सरोमांच, तो –
हर्षे, स्वेदिं भरे, उठे, न दिसतां तूं तत्क्षणीं मूर्च्छतो . १२

नेत्रांना अंजनें हा जणुं भरत असे, ठेवि कर्णीं तमाला,
कस्तूरीनें स्तनांना सजवि, जणु शिरीं अर्पि नीलाब्जमाला,
सर्वांगीं नीलवस्त्रें, अभिसरणपरा स्त्रीस झांकीत ऐसी
राधे ! अंधार तो हा बघ युवतिजनां देइ आलिंगनासी! १३

काश्मीरगौरतनु लेवुनि रत्नकांची
रेघेसमान दिसते अभिसारिकांची;
अंधार हाचि निकषोपल भासला गे !
त्यांचें जणूं प्रणयहेम कसास लागे !" १४

* * *

अलंकारांचा तो मणिगण जिथें वारि तिमिरा,
अशा कुंजद्वारीं निरखुनि उभ्या त्या प्रियकरा –

अधोदृष्टी पाहे कमलवदना लज्जित मनीं,
सखी तीतें बोले बहुकुशल जे खेददमनीं . १५

* * *

" सुभग सदन केलें रम्य लावूनि वेली,
मधुरिपुसह येथें त्वां करावीस केली;
स्मितमुखि रतिकामे राधिके ! आंत जा, ग !
रमुनि रमणसंगें सर्वही रात जाग ! १६

मृदुल नवदलांच्या कोंवळ्या मंचकाची
रुचि जर तव चित्तीं, राधिके ! आंत जाचि !
तव कुचकलशांशीं खेळतो पुष्पहार,
हरिकरकमळांही तेथ लाभो विहार ! १७

परिमळ सुमनांचा कोंदला आंत भारी,
प्रियकरहि तुझा तो तेथ आहे मुरारी ;
तव तनु सुकुमारी ही जणूं गौर वेल;
हरिविण कवणें ती राधिके ! गौरवेल ? १८

मलयपवन राधे ! वाहतो मंद मंद,
त्वरित रमणि ! आतां गांठ आनंदकंद ;
गुणगण रमणाचे घोळुनी अंतरंगीं –
गुणगुण करिशी तूं मुग्ध शृंगारभृंगी ! १९

रुचिर विविध वेली शोभती मंडपाला,
शयनिं कमलिनींचा घातला थंड पाला ;
बहुपृथुलनितंबे पीनरंभोरु बाळे !
लवकरि हरिसंगें खेळ जा गे ! रसाळे ! २०

मधुकर मधुलोभें मीनले सर्व आंत,
श्रवणमधुर नादें तेथ आहेत गात;
कुसुमशर तुझ्या या मोह घाली मनासी
रमुनि रमवुनी ती मोहिनी शीघ्र नाशीं . २१

कलरव करिती या कोकिला कूउकूऊ
वदति जणुं ' वसंतीं आम्हि ऐशाचि गाऊं ! '
सुदति ! शयनसद्मीं तूंहि ऐशीच जा ग !
प्रियकर रमवावा त्वां सदा सानुराग. " २२

* * *

सुखवि निजसतीला नित्य पद्मावतीला,
नमुनि हरिपदांला जो मनामाजिं धाला,
कविवर जयदेवा त्या, तसें माउलीला
करुनि नमन गाई ' राम ' गोविंद-लीला . २३

* * *

" चित्तानें वाहुनीयां सुचिर तुज, सये ! जो अतिश्रांत झाला,
कंदर्पें तप्त केला, तव अधरसुधा इच्छितो प्यावयाला,
राधे ! अंकीं तयाच्या क्षणभरिं बस गे ! भीरु ! भ्यावें कशास ?
त्वां हा भ्रूक्षेपमूल्यें सखि ! विकत नवा घेतला कृष्णदास. " २४

* * *

ती भीत भीत ललना सदनांत गेली,
नेत्रें मुकुंदवदना बघण्या भुकेलीं;
केला निनाद चरणांबुजिं नूपुरांनीं,
सानंद मंद जणुं ते कलहंस रानीं ! २५

विलासाची इच्छा बहु दिन जयाची न पुरली,
गमे ज्याच्या रूपीं मदनशतकें काय मुरलीं,
प्रियालाभें झाला अतिशयाचि जो हर्षित मनीं,
तया देखे राधा मुदितहृदया केलिभवनीं. २६

बघूनी राधेला उठति हृदयीं प्रेमलहरी,
असावी ती ज्योत्स्ना सलिलनिधि हा कोमल हरी,
नव्हे कीं तें राधावदन, परि तो केवळ शशी –
विकासी कांताच्या मुखकुमुदिनीतें जणुं निशीं ! २७

निळया वक्षोभागीं धवल वनमाला विलसली,
वियद्गंगा ती कीं विमल गगनामाजिं दिसली !
असे किंवा फेनोद्गमाचि यमुना-नील-सलिलीं !
गमे त्या कृष्णाब्दीं रुचिर चपला काय हलली ! २८

हरीची ती श्यामा मृदुल अभिरामा तनुलता,
बघोनी जी डोळां, सकळ सुरमेळाहि भुलता;
वरी शोभा देतें शुभ वसन, ज्या रंग पिवळा,
परागांचें वेष्टी पटल जणुं तें नील कमळा ! २९

कटाक्षांतें फेंकी मुरलिधर तो श्यामलतनू
मृगाक्षींचे चित्तीं उपजविति जे मानसजनू
शरत्कालीं भासे मधुरिपुतडागांत विहग
मुखांभोजीं लीलापर चपळ कीं खंजनयुग . ३०

प्रभेनें चंडांशुद्वयसम असें कुंडलयुग
सुशोभे तें कर्णीं, वदनकमला सेवि सुभग,
विराजे जें गालीं अरुण अधरीं हास्य धवल
अनंगातें निर्मी युवतिहृदयीं, हें न नवल. ३१

दिसावे जैसे ते शशिकिरण मेघोदरिं निशीं
मुकुंदाच्या केशीं धवलकुसुमें शोभति तशीं;
टिळा श्रीखंडाचा निटिलिं बघुनी हें मनिं सुचे –
असे कीं अंधारावरति जणु तें बिंब विधुचें ! ३२

प्रियाप्रेमोत्कर्षें पुलक उठले नीलतनुला,
स्फुरे चित्तीं त्याच्या सुरतमधुतृष्णाहि अतुला ;
शरीरीं रत्नांचे नग विखरिती दीप्तिकिरण,
असा तो राधेचा रमण दिसला कामशरण. ३३

श्रीकृष्णमूर्ति बहु सोज्ज्वळ रूपखाणी,
तातें करी द्विगुणिता जयदेव-वाणी;
हा शार्ङ्गपाणि, जनहो ! हृदयांत राहो !
संसारवारिनिधितें सहजीं तरा हो ! ३४

बघोनी नाथातें विमलतम हर्षाश्रु तिजला
तदा आले त्यांनीं हळु हळु तिचा गाल भिजला.
निघाले जे जाया श्रवणपुटपर्यंत नयन
श्रमें तत्स्वेदाचें घडत जणु तें तेथ पतन ! ३५

राधा लाजोनि पाहे प्रियकरवदना, रम्य जें कामभावें,
जाई शय्येकडे ती परि बघुनि सख्या हांसती त्या स्वभावें ;
गेल्या बाहेर, हास्या लपवुनि कपटें खाजवूनी कपोलीं,
लज्जाही राधिकेची त्वरित सहजिं ती पार कोठें लपाली ! ३६

* * *

मारोनी बाहुदंडें सहज कुवलयापीड नामें गजासी
रक्तानें बाहु शोभे, मुदित जणुं तया वीर सेंदूर फासी:
देवेंद्रें वर्षिलीं ज्यावारि जयसुमनें दिव्यमंदार मोदें
तो बाहु श्रीहरीचा प्रिय निजभजकां सर्व सौख्यें सदा दे. ३७

सानंदगोविंद नामक
अकरावा सर्ग
समाप्त

# सर्ग बारावा



[ **प्रबंध २३ वा**–श्रीकृष्णाची राधिकेस रतिप्रार्थना ( श्लोक २–११ ); रतोत्सववर्णन (१२–१८); **प्रबंध २४ वा**–सुरतोत्सवानंतर विस्काळित झालेला आपला शृंगार राधिका श्रीकृष्णाकडून पुनः नीट करवून घेते ( १९–२८ ); पुनश्च तेंच सांगते ( २९ ); उपसंहार ( ३०–३५ ). ]

गेल्या जेव्हां चतुरमति त्या प्रेमळा सर्व आली,
राधाचित्तीं मदन भरला लाज जाया निघाली;
हास्यें शोभे; मृदुल शयना लोलनेत्री विलोकी;
बोले तीतें प्रियकर तिचा, पाळिता जो त्रिलोकी. १

*　　　*　　　*

" हे राधिके ! सुंदरि ! मुग्ध बाले !
त्वद्दर्शनें मन्मन हें निवालें !
प्रार्थीतसे हा तुज नम्र दास
हे भीरु ! रंभोरु ! न हो उदास. २

तव पदीं रत हा मुरलीधर,
कुसुमसायक ज्या करि जर्जर.
क्षणभरीं मज लाभ तुझा घडो,
हृदयदैवत हें मम सांपडो ! ३

किसलयशयनीं या कंजनेत्र ! सुशीले !
निजपदकमलांना ठेव तूं, गौरबाले !

मृदु शयन गमे हें त्वत्पदांभोजवैरी,
रुचिर कितिहि झालें तें तरी न्यून भारी. ४

तुजकडुनि निशी मीं चालवीलींहि रानें,
श्रम बहु दयितेला म्यां दिले निष्टुरानें;
मजसमचि घडे ज्यां त्वत्पदीं सन्निवास,
पळभरि शयनीं त्या ठेव तूं नूपुरांस. ५

मधुर मधुर ऐसे, वल्लभे ! बोल बोल !
अमृत मजसि देवो त्वन्मुखेंदू अमोल
पृथुल कुचयुगातें झांकितें वस्त्र हें जें
विरहसम गमे तें काढितों गे ! न लाजें. ६

मदनदहन जाळी माझिया अंतरातें,
निजकुचकलशांनीं शांतवीं त्यासि, कांते !
प्रियतमपरिरंभा फार जे वाछिणारे
पुलकिततनु राधे ! ते कुणा लाभणारे ? ७

सखि ! मज निजतेजें दग्ध केलें अनंगें;
अशरण तव पायीं लीन झालों प्रिये गे !
मज अधरसुधा ती द्यावया होइं सिद्ध;
अमृत मृततनूही ऊठवी हें प्रसिद्ध ! ८

तव मधुरनिनादा मेखला मंजु वाजो,
श्रवणिं रव पडूं दे ऐकण्या त्या हवा जो;
मम विरहि मनाला त्रासिलें कोकिळांनीं;
सुमुखि ! बघवते कीं माधवप्राणहानी ? ९

हरिणनयनराधे ! कारणांवीण कोपें –
बघसि मजसि वक्रा, तों तुझें चक्षु लोपे,
निरखुनि गमतें कीं लाजतें तें बघाया,
त्यजुनि सकळ रोषा, ये रमाया क्षणीं या !" १०

* * *

मृगाक्षीतें ऐसें प्रणयमय तो माधव वदे,
घनश्यामाचें तें हृदय भरलें हो ! बहु मुदें;
कथा शृंगाराची सुकविजयदेवें रचियली
गमे श्रीकृष्णाच्या रसिकभजकां ती अति भली. ११

प्रियेला आलिंगी परि पुलकितें व्यत्यय घडे,
बघे प्रेमें डोळां तरिहि निमिषें खंडचि पडे,
कथाक्रीडांनीं तो अधरमधुपानासि विसरी,
तसें अत्यानंदें सुरतहि सरे, ज्या नच सरी. १२

बाहूंनीं बांधिलेला, कुचकलशभरें कर्कशें पीडिलेला,
दंतांनीं खंडिलेला, नखिंहि छळियला, श्रोणिंनीं ताडिलेला
हस्तानें वांकवीला कच धरुनि, मधू पाजुनी मूढ केला; –
या रीतीं कांत धाला; कुसुमशर अहो ! वक्रमार्गा भुकेला ! १३

कांतातें नमवावया स्मररणीं, जों व्यूह धैर्यें रची,
तों स्तब्धा जघनस्थली, शिथिलही हो बाहुवल्ली तिची;
वामाक्षीहृदयासि कंप सुटला, झांके भयें नेत्र तो;
बाला त्या अबलाचि ! पौरुषरस स्त्रीतें कुठें साधतो ? ! १४

वक्षोभागीं नखांचीं अकरुण हृदयें केलिं कांतें क्षतें तीं,
नेत्रांचा रक्तिमा तो, अधरीं अरुणता जाहली छिन्न दंतीं,

वेणीमाळा गळाली, निरखिलि कटिची साडिही सैल काळी,
बाणांनीं या स्मराच्या, पतिहृदय पहा विद्ध केलें सकाळीं! १५

' राधे ! तूं अनुरक्त आपण अशी माझ्यावरी पाहतां
अप्राप्या तुज जाणुनी, शिव गमे प्याला विषा तत्त्वतां '
ऐशा पूर्वकथामिषें भुलवुनी, ओढूनि वामांचला
पाहे जो स्तनकोरकां रमणिच्या, तो कृष्ण पावो मला ! १६

वेणी सारी सुटोनी अलक विखुरले, स्वेद गालांसि आला,
ओष्ठांची गेलि लाली, सरलि कुचतटांपासुनी रत्नमाला;
कांचीही मौक्तिकांची ढळलि कुणिकडे ! हें असें आत्मरूप –
देखे ती लाजुनीयां, परि हरिसि दिला हर्ष तेणें अमूप. १७

किंचित् लोचन झांकलें, विलसलें अत्यंत रम्य स्मित,
सीत्कारां करितांचि दंतरुचि दे शुभ्रत्व ओष्ठांप्रत;
श्वासें कंपित जे पयोधर तयां देऊनि आलिंगन
हर्षें आनन चुंबितो रमणिचें तो धन्य, हो, अन्य न ! १८

* * *

करुनि सुरतकेली होय ती क्लांत बाला,
मदन-दहन तीचा अंतरीं शांत झाला;
' सजविं हरि ! तनू ' हें बोलली, लाजली न;
यदुपति बहु होता राधिकेच्या अधीन . १९

स्मितमुखी रमणी दमली रतें,
हरि तिचें करि पूजन थोर तें;

हरिखली हरिची हृदयेश्वरी
प्रियकराप्रति बोललि यापरी. २०

* * *

" हे नाथ ! शीतल करें मज सौख्य द्यावें,
कस्तूरिनें मम पयोधर रंगवावे,
जो पंचबाण रतिकांत अनंगराया,
हे हेमकुंभ जणु मंगल त्या कराया ! २१

ज्या पाहतां भ्रमरगर्व असे गळाला,
त्या चुंबिलेंसि, हरि ! लोचनकज्जलाला,
तूं त्यांत तें भर करांगुलिनें मुरारे !
नेत्रेंचि काम निजसायक सोडि सारे ! २२

हीं कुंडलें नयनरम्य तशीं सुवर्णी
तूं माझिया, हृदयवल्लभ ! घाल कर्णी;
हे कर्ण पाश जणुं भासति मन्मथाचे
जे आंवरीति, जर नेत्र–कुरंग नाचे ! २३

भृंगाहुनी असित कुंतल हे, मुकुंदा !
जे झांकिती विमल मद्वदनारविंदा;
या त्रास देति किति षट्पदपंक्ति धीट !
हे खेळते अलक माधव ! बांध नीट ! २४

हे पुंडरीकनयना ! मम भालभागीं
कस्तूरिकातिलक सुंदर लाव वेगीं;
झालेत घर्मजलबिंदु अदृश्य आतां,
भासो कलंक वदनेंदुसि या पहातां . २५

जे बंधमुक्त अतिसुंदर कृष्ण केश,
  जे शोभती मज मयूरशिखंडवेश,
जे चामरें ध्वज जणों मदनासि होती,
  तूं त्यांत अर्पि सुमनें प्रियमाधवा ! तीं . २६

डोले जिथें मदनवारण तो मदांध,
  त्या या मदीय जघनीं रशनेसि बांध;
हे वल्लभा ! हृदयपंकजकोशभृंगा !
  तूं भूषवीं सतत या मम अंतरंगा ! ” २७

* * *

स्मृति हरिचरणाची हीच पीयूषधारा
  कलिकलुषित चित्ता, सेवुनी ही, सुधारा !
शुभकर जयदेवें निर्मिले जे प्रबंध,
  रसिकहृदय घेई त्यांतला दिव्यगंध . २८

* * *

“ कुचतटिं हरे ! काढीं चित्रें तशीच कपोलिंही,
  कटिसि सखया ! कांची घालीं, गळां मम माळ ही,
कनकवलयें हातीं घालीं ! पदांबुजिं नूपुर ! ”
  वदत दयिता जें जें, तें तें करी प्रिय तत्पर ! २९

* * *

शेषाच्या शतशः फणामणिगणीं बिंबें सहस्रावधी
  कृष्णें जीं धारिलीं, जणों म्हणतसे, जो आत्मचित्तामधीं –
‘ दों नेत्रें अपुरीं ! असंख्य-नयनीं पाहूं रमारूप तें ’ –
  तो तूं पाव मला; प्रणाम कमलानाथा ! तुला श्रीपते ! ३०

जी गांधर्वकलेंतली कुशलता, जी कृष्णभक्ती मनीं,
जी शृंगारमयी मनोज्ञ रचना चित्तासि आल्हादिनी,
त्यांचा स्वाद जरी असेल बघणें, प्राज्ञा ! स्वकीये मतीं
वाचावी जयदेवपंडितकृति श्रीगीतगोविंद ती . ३१

* * *

श्रीभोजदेव, राधादेवी हीं होत ज्या पिताजननी
त्या श्रीजयदेवाचें राहो सत्काव्य हो ! रसज्ञमनीं . ३२

वाणी शृंगारखाणी अवनिवरि असे जोंवरी या कवीची
सोडीं गर्वा मधो ! तूं तंवर कर बये ! शर्करे ! तूंहि तेंचि !
द्राक्षे ! भक्षूं तुला कां ? नच तुजहि सुधे ! भासशी नीर दुग्धा !
आम्रा ! त्वां नम्र व्हावें; धर आणिं अधरा ! तूं दुजा मार्ग मुग्धा ! ३३

* * *

रसिकमनोभ्रमर रमे सुमधुररसशालि गीतगोविन्दें;
म्यां गाइलें यथामति तद्भावार्थासि आपुल्या छंदें. ३४

श्रीराधादामोदर, कविवर जयदेव तेविं रसिकवर
हर्षोत या कृतीनें, जोडितसे ‘ राम ’ त्यांप्रति स्वकर. ३५

**प्रीतपीतांबर नामक बारावा सर्ग**

**समाप्त**

**सुश्लोकगोविंद संपूर्ण**

। श्रीकृष्णार्पणमस्तु ।

अथ

श्रीजयदेवकविविरचितं

# गीतगोविन्दम् ।

|| श्रीः ||

श्रीजयदेवकविविरचितं

# गीतगोविन्दम् ।

## प्रथमः सर्गः ।

मेघैर्मेदुरमम्बरं वनभुवः श्यामास्तमालद्रुमै-
नक्तं भीरुरयं त्वमेव तदिमं राधे गृहं प्रापय ॥
इत्थं नन्दनिदेशतश्चलितयोः प्रत्यध्वकुञ्जद्रुमं
राधामाधवयोर्जयन्ति यमुनाकूले रहःकेलयः ॥ १ ॥

वाग्देवताचरितचित्रितचित्तसद्मा पद्मावतीचरणचारणचक्रवर्ती ।
श्रीवासुदेवरतिकेलिकथासमेतमेतं करोति जयदेवकविः प्रबन्धम् ॥२॥

यदि हरिस्मरणे सरसं मनो यदि विलासकलासु कुतूहलम् ॥
मधुरकोमलकान्तपदावलिं शृणु तदा जयदेवसरस्वतीम् ॥३॥

वाचः पल्लवयत्युमापतिधरः सन्दर्भशुद्धिं गिरां
जानीते जयदेव एव शरणः श्लाघ्यो दुरूहद्रुतेः ॥
शृङ्गारोत्तरसत्प्रमेयरचनैराचार्यगोवर्धन-
स्पर्द्धी कोऽपि न विश्रुतः श्रुतिधरो धोयी कविक्ष्मापतिः ॥४॥

**( अथ प्रथमप्रबन्धो मालवरागेण रूपकताले गीयते । )**

प्रलयपयोधिजले धृतवानसि वेदम् । विहितवहित्रचरित्रमखेदम् ॥
केशव धृतमीनशरीर जय जगदीश हरे ॥ १॥

क्षितिरतिविपुलतरे तव तिष्ठति पृष्ठे । धरणिधरणकिणचक्रगरिष्ठे ॥
केशव धृतकच्छपरूप जय जगदीश हरे ॥ २ ॥

वसति दशनशिखरे धरणी तव लग्ना । शशिनि कलङ्ककलेव निमग्ना ॥
केशव धृतसूकररूप जय जगदीश हरे ॥ ३ ॥

तव करकमलवरे नखमद्भुतशृङ्गम् । दलितहिरण्यकशिपुतनुभृङ्गम् ॥
केशव धृतनरहरिरूप जय जगदीश हरे ॥ ४ ॥

छलयसि विक्रमणे बलिमद्भुतवामन । पदनखनीरजनितजनपावन ॥
केशव धृतवामनरूप जय जगदीश हरे ॥ ५ ॥

क्षत्रियरुधिरमये जगदपगतपापम् । स्नपयसि पयसि शमितभवतापम् ॥
केशव धृतभृगुपतिरूप जय जगदीश हरे ॥ ६ ॥

वितरसि दिक्षु रणे दिक्पतिकमनीयम् । दशमुखमौलिबलिं रमणीयम् ॥
केशव धृतरघुपतिरूप जय जगदीश हरे ॥ ७ ॥

वहसि वपुषि विशदे वसनं जलदाभम् । हलहतिभीतिमिलितयमुनाभम् ॥
केशव धृतहलधररूप जय जगदीश हरे ॥ ८ ॥

निन्दसि यज्ञविधेरहह श्रुतिजातम् । सदयहृदय दर्शितपशुघातम् ॥
केशव धृतबुद्धशरीर जय जगदीश हरे ॥ ९ ॥

म्लेच्छनिवहनिधने कलयसि करवालम् । धूमकेतुमिव किमपि करालम् ॥
केशव धृतकल्किशरीर जय जगदीश हरे ॥ १० ॥

श्रीजयदेवकवेरिदमुदितमुदारम् । शृणु सुखदं शुभदं भवसारम् ॥
केशव धृतदशविधरूप जय जगदीश हरे ॥ ११ ॥

( इति प्रथमः प्रबन्धः । )

वेदानुद्धरते जगन्ति वहते भूगोलमुद्बिभ्रते
दैत्यं दारयते बलिं छलयते क्षत्रक्षयं कुर्वते ।
पौलस्त्यं जयते हलं कलयते कारुण्यमातन्वते
म्लेच्छान्मूर्च्छयते दशाकृतिकृते कृष्णाय तुभ्यं नमः ॥ ५ ॥

( अथ द्वितीयप्रबन्धो गुर्जरीरागेण प्रतिमठताले गीयते । )

श्रितकमलाकुचमण्डल धृतकुण्डल ए ।
कलितललितवनमाल जय जय देव हरे ॥ १ ॥

दिनमणिमण्डलमण्डन भवखण्डन ए ।
मुनिजनमानसहंस जय जय देव हरे ॥ २ ॥

कालियविषधरगञ्जन जनरञ्जन ए ।
यदुकुलनलिनदिनेश जय जय देव हरे ॥ ३ ॥

मधुमुरनरकविनाशन गरुडासन ए ।
सुरकुलकेलिनिदान जय जय देव हरे ॥ ४ ॥

अमलकमलदललोचन भवमोचन ए ।
त्रिभुवनभवननिधान जय जय देव हरे ॥ ५ ॥

जनकसुताकृतभूषण जितदूषण ए ।
समरशमितदशकण्ठ जय जय देव हरे ॥ ६ ॥

अभिनवजलधरसुन्दर धृतमन्दर ए ।
श्रीमुखचन्द्रचकोर जय जय देव हरे ॥ ७ ॥

तव चरणे प्रणता वयमिति भावय ए ।
कुरु कुशलं प्रणतेषु जय जय देव हरे ॥ ८ ॥

श्रीजयदेवकवेरिदं कुरुते मुदम् ।
मङ्गलमुज्ज्वलगीतं जय जय देव हरे ॥ ९ ॥

( इति द्वितीयः प्रबन्धः । )

पद्मापयोधरतटीपरिरम्भलग्नकाश्मीरमुद्रितमुरो मधुसूदनस्य ॥
व्यक्तानुरागमिव खेलदनङ्गखेदस्वेदाम्बुपूरमनुपूरयतु प्रियं वः ॥६॥

वसन्ते वासन्तीकुसुमसुकुमारैरवयवै-
भ्रमन्तीं कान्तारे बहुविहितकृष्णानुसरणाम् ॥
अमन्दं कन्दर्पज्वरजनितचिन्ताकुलतया
चलद्बाधां राधां सरसमिदमूचे सहचरी ॥७॥

**( अथ तृतीयप्रबन्धो वसन्तरागेण रूपकताले गीयते। )**

विहरति हरिरिह सरसवसन्ते। नृत्यति युवतिजनेन समं सखि
विरहिजनस्य दुरन्ते ॥ ध्रु० ॥

ललितलवङ्गलतापरिशीलनकोमलमलयसमीरे।
मधुकरनिकरकरम्बितकोकिलकूजितकुञ्जकुटीरे ॥ १ ॥

उन्मदमदनमनोरथपथिकवधूजनजनितविलापे।
अलिकुलसंकुलकुसुमसमूहनिराकुलबकुलकलापे ॥ २ ॥

मृगमदसौरभरभसवशंवदनवदलमालतमाले।
युवजनहृदयविदारणमनसिजनखरुचिकिंशुकजाले ॥ ३ ॥

मदनमहीपतिकनकदण्डरुचिकेशरकुसुमविकासे।
मिलितशिलीमुखपाटलिपटलकृतस्मरतूणविलासे ॥ ४ ॥

विगलितलज्जितजगदवलोकनतरुणकरुणकृतहासे।
विरहिनिकृन्तनकुन्तमुखाकृतिकेतकिदन्तुरिताशे ॥ ५ ॥

माधविकापरिमलललिते नवमालतिजातिसुगन्धौ।
मुनिमनसामपि मोहनकारिणि तरुणाकारणबन्धौ ॥ ६ ॥

स्फुरदतिमुक्तलतापरिरम्भणमुकुलितपुलकितचूते।
वृन्दावनविपिने परिसरपरिगतयमुनाजलपूते ॥ ७ ॥

श्रीजयदेवभणितमिदमुदयतु हरिचरणस्मृतिसारम्
सरसवसन्तसमयवनवर्णनमनुगतमदनविकारम् ॥ ८ ॥

**( इति तृतीयः प्रबन्धः। )**

दरविगलितमल्लीवल्लिचञ्चत्परागप्रकटितपटवासैर्वासयन् काननानि ॥
इह हि दहति चेतः केतकीगन्धबन्धुः प्रसरदसमबाणप्राणवद्गन्धवाहः॥८॥

उन्मीलन्मधुगन्धलुब्धमधुपव्याधूतचूताङ्कुर–
क्रीडत्कोकिलकाकलीकलकलैरुद्गीर्णकर्णज्वराः ॥
नीयन्ते पथिकैः कथं कथमपि ध्यानावधानक्षण–
प्राप्तप्राणसमासमागमरसोल्लासैरमी वासराः ॥९॥

अनेकनारीपरिरम्भसंभ्रमस्फुरन्मनोहारिविलासलालसम् ॥
मुरारिमारादुपदर्शयन्त्यसौ सखी समक्षं पुनराह राधिकाम् ॥१०॥

**( अथ चतुर्थप्रबन्धो रामकरिरागेण रूपकताले गीयते । )**

हरिरिह मुग्धवधूनिकरे । विलासिनि विलसति केलिपरे ॥ध्रु०॥

चन्दनचर्चितनीलकलेवरपीतवसनवनमाली ।
केलिचलन्मणिकुण्डलमण्डितगण्डयुगस्मितशाली ॥ १ ॥

पीनपयोधरभारभरेण हरिं परिरम्य सरागम् ।
गोपवधूरनुगायति काचिदुदञ्चितपञ्चमरागम् ॥ २ ॥

कापि विलासविलोलविलोचनखेलनजनितमनोजम् ।
ध्यायति मुग्धवधूरधिकं मधुसूदनवदनसरोजम् ॥ ३ ॥

कापि कपोलतले मिलिता लपितुं किमपि श्रुतिमूले ।
चारु चुचुम्ब नितम्बवती दयितं पुलकैरनुकूले ॥ ४ ॥

केलिकलाकुतुकेन च काचिदमुं यमुनाजलकूले ।
मञ्जुलवञ्जुलकुञ्जगतं विचकर्ष करेण दुकूले ॥ ५ ॥

करतलतालतरलवलयावलिकलितकलस्वनवंशे ।
रासरसे सहनृत्यपरा हरिणा युवतिः प्रशशंसे ॥ ६ ॥

श्लिष्यति कामपि चुम्बति कामपि रमयति कामपि रामाम् ।
पश्यति सस्मितचारु परामपरामनुगच्छति बामाम् ॥७॥

श्रीजयदेवकवेरिदमद्भुतकेशवकेलिरहस्यम् ।
वृन्दावनविपिने ललितं वितनोतु शुभानि यशस्यम् ॥८॥

( इति चतुर्थः प्रबन्धः । )

विश्वेषामनुरञ्जनेन जनयन्नानन्दमिन्दीवर-
श्रेणीश्यामलकोमलैरुपनयन्नङ्गैरनङ्गोत्सवम् ॥
स्वच्छन्दं व्रजसुन्दरीभिरभितः प्रत्यङ्गमालिङ्गितः
शृङ्गारः सखि मूर्तिमानिव मधौ मुग्धो हरिः क्रीडति ॥११॥

अद्योत्सङ्गवसद्भुजङ्गकवलक्लेशादिवेशाचल-
प्रालेयप्लवनेच्छयानुसरति श्रीखण्डशैलानिलः ॥
किंच स्निग्धरसालमौलिमुकुलान्यालोक्य हर्षोदया-
दुन्मीलन्ति कुहूः कुहूरिति कलोत्तालाः पिकानां गिरः ॥१२॥

रासोल्लासभरेण विभ्रमभृतामाभीरवामभ्रुवा-
मभ्यर्णे परिरभ्य निर्भरमुरः प्रेमान्धया राधया ॥
साधु त्वद्वदनं सुधामयमिति व्याहृत्य गीतस्तुति-
व्याजादुद्भटचुम्बितास्मितमनोहारी हरिः पातु वः ॥१३॥

इति श्रीगीतगोविन्दे सामोददामोदरो नाम
प्रथमः सर्गः ।

# द्वितीयः सर्गः ।



विहरति वने राधासाधारणप्रणये हरौ
विगलितनिजोत्कर्षादीर्ष्यावशेन गतान्यतः ॥
क्वचिदपि लताकुञ्जे गुञ्जन्मधुव्रतमण्डली–
मुखरशिखरे लीना दीनाप्युवाच रहः सखीम् ॥ १ ॥

**( अथ पञ्चमप्रबन्धो गुर्जरीरागेण रूपकताले गीयते । )**

रासे हरिमिह विहितविलासम् । स्मरति मनो मम कृतपरिहासम् ॥ध्रु०॥

संचरदधरसुधामधुरध्वनिमुखरितमोहनवंशम् ।
चलितदृगञ्चलचञ्चलमौलिकपोलविलोलवतंसम् ॥ १ ॥

चन्द्रकचारुमयूरशिखण्डकमण्डलवलयितकेशम् ।
प्रचुरपुरन्दरधनुरनुरञ्जितमेदुरमुदिरसुवेशम् ॥ २ ॥

गोपकदम्बनितम्बवतीमुखचुम्बनलम्भितलोभम् ।
बन्धुजीवमधुराधरपल्लवमुल्लसितस्मितशोभम् ॥ ३ ॥

विपुलपुलकभुजपल्लववलयितबल्लवयुवतिसहस्रम् ।
करचरणोरसि मणिगणभूषणकिरणविभिन्नतमिस्रम् ॥ ४ ॥

जलदपटलचलदिन्दुविनिन्दकचन्दनतिलकललाटम् ।
पीनपयोधरपरिसरमर्दननिर्दयहृदयकपाटम् ॥ ५ ॥

मणिमयमकरमनोहरकुण्डलमण्डितगण्डमुदारम् ।
पीतवसनमनुगतमुनिमनुजसुरासुरवरपरिवारम् ॥ ६ ॥

विशदकदम्बतले मिलितं कलिकलुषभयं शमयन्तम् ।
मामपि किमपि तरङ्गदनङ्गदृशा मनसा रमयन्तम् ॥ ७ ॥

श्रीजयदेवभणितमतिसुन्दरमोहनमधुरिपुरूपम् ।
हरिचरणस्मरणं प्रति संप्रति पुण्यवतामनुरूपम् ॥ ८ ॥

(इति पञ्चमः प्रबन्धः ।)

गणयति गुणग्रामं भ्रामं भ्रमादपि नेहते
वहति च परीतोषं दोषं विमुञ्चति दूरतः ॥
युवतिषु चलत्तृष्णे कृष्णे विहारिणि मां विना ॥
पुनरपि मनो वामं कामं करोति करोमि किम् ॥ २ ॥

(अथ षष्ठप्रबन्धो मालवरागेण एकतालीताले गीयते ।)

सखि हे केशिमथनमुदारम् । रमय मया सह मदनमनोरथ–
भावितया सविकारम् ॥ ध्रु० ॥

निभृतनिकुञ्जगृहं गतया निशि रहसि निलीय वसन्तम् ।
चकितविलोकितसकलदिशा रतिरभसभरेण हसन्तम् ॥ १ ॥

प्रथमसमागमलज्जितया पटुचाटुशतैरनुकूलम् ।
मृदुमधुरस्मितभाषितया शिथिलीकृतजघनदुकूलम् ॥ २ ॥

किसलयशयननिवेशितया चिरमुरसि ममैव शयानम् ।
कृतपरिरम्भणचुम्बनया परिरभ्यकृताधरपानम् ॥ ३ ॥

अलसनिमीलितलोचनया पुलकावलिललितकपोलम् ।
श्रमजलसिक्तकलेवरया वरमदनमदादतिलोलम् ॥ ४ ॥

कोकिलकलरवकूजितया जितमनसिजतन्त्रविचारम् ।
श्लथकुसुमाकुलकुन्तलया नखलिखितघनस्तनभारम् ॥ ५ ॥

चरणरणितमणिनूपुरया परिपूरितसुरतवितानम् ।
मुखरविशृङ्खलमेखलया सकचग्रहचुम्बनदानम् ॥ ६ ॥

रतिसुखसमयरसालसया दरमुकुलितनयनसरोजम् ।
निःसहनिपतिततनुलतया मधुसूदनमुदितमनोजम् ॥ ७ ॥

श्रीजयदेवभणितमिदमतिशयमधुरिपुनिधुवनशीलम् ।
सुखमुत्कण्ठितराधिकया कथितं वितनोतु सलीलम् ॥ ८ ॥

( इति षष्ठः प्रबन्धः । )

हस्तस्रस्तविलासवंशमनृजुभ्रूवल्लिमद्बल्लवी–
वृन्दोत्सारि दृगन्तवीक्षितमतिस्वेदार्द्रगण्डस्थलम् ॥
मामुद्वीक्ष्य विलज्जितस्मितसुधामुग्धाननं कानने
गोविन्दं व्रजसुन्दरीगणवृतं पश्यामि हृष्यामि च ॥ ३ ॥

दुरालोकस्तोकस्तबकनवकाशोकलतिका–
विकाशः कासारोपवनपवनोऽपि व्यथयति ॥
अपि भ्राम्यद्भृङ्गीरणितरमणीया न मुकुल–
प्रसूतिश्चूतानां सखि शिखरिणीयं सुखयति ॥ ४ ॥

साकूतस्मितमाकुलाकुलगलद्धम्मिल्लमुल्लासित–
भ्रूवल्लीकमलीकदर्शितभुजाबालार्धहस्तस्तनम् ॥
गोपीनां निभृतं निरीक्ष्य ललितां कांचिच्चिरं चिन्तय–
न्नन्तर्मुग्धमनोहरो हरतु वः क्लेशं नवः केशवः ॥ ५ ॥

इति श्रीगीतगोविन्दे अक्लेशकेशवो नाम
द्वितीयः सर्गः ।

# तृतीयः सर्गः ।

कंसारिरपि संसारवासनाबन्धशृङ्खलाम् ॥
राधामाधाय हृदये तत्याज व्रजसुन्दरीः ॥ १ ॥

इतस्ततस्तामनुसृत्य राधिकामनङ्गबाणव्रणखिन्नमानसः ॥
कृतानुतापः स कलिन्दनन्दिनीतटान्तकुञ्जे निषसाद माधवः ॥ २ ॥

**( अथ सप्तमप्रबन्धो गुर्जरीरागेण प्रतिमठताले गीयते । )**

हरि हरि हतादरतया गता सा कुपितेव ॥ ध्रु० ॥

मामियं चलिता विलोक्य वृतं वधूनिचयेन ।
सापराधतया मयापि न वारितातिभयेन ॥१॥

किं करिष्यति किं वदिष्यति सा चिरं विरहेण ।
किं जनेन धनेन किं मम जीवितेन गृहेण ॥२॥

चिन्तयामि तदाननं कुटिलभ्रु रोषभरेण ।
शोणपद्ममिवोपरि भ्रमताकुलं भ्रमरेण ॥३॥

तामहं हृदि संगतामनिशं भृशं रमयामि ।
किं वनेऽनुसरामि तामिह किं वृथा विलपामि ॥४॥

तन्वि खिन्नमसूयया हृदयं तवाकलयामि ।
तन्न वेद्मि कुतो गतासि न तेन तेऽनुनयामि ॥५॥

दृश्यसे पुरतो गतागतमेव मे विदधासि ।
किं पुरेव ससंभ्रमं परिरम्भणं न ददासि ॥६॥

क्षम्यतामपरं कदापि तवेदृशं न करोमि ।
देहि सुन्दरि दर्शनं मम मन्मथेन दुनोमि ॥७॥

वर्णितं जयदेवकेन हरेरिदं प्रणतेन ।
किन्दुबिल्वसमुद्रसम्भवरोहिणीरमणेन ॥८॥

**( इति सप्तमः प्रबन्धः । )**

हृदि बिसलताहारो नायं भुजङ्गमनायकः
कुवलयदलश्रेणी कण्ठे न सा गरलद्युतिः ॥
मलयजरजो नेदं भस्म प्रियारहिते मयि
प्रहर न हरभ्रान्त्यानङ्ग क्रुधा किमु धावसि ॥ ३ ॥

पाणौ मा कुरु चूतसायकममुं मा चापमारोपय
क्रीडानिर्जितविश्व मूर्च्छितजनाघातेन किं पौरुषम् ॥
तस्या एव मृगीदृशो मनसिजप्रेङ्खत्कटाक्षाशुग-
श्रेणीजर्जरितं मनागपि मनो नाद्यापि संधुक्षते ॥ ४ ॥

भ्रूपल्लवो धनुरपाङ्गतरङ्गितानि बाणा गुणः श्रवणपालिरिति स्मरेण ॥
तस्यामनङ्गजयजङ्गमदेवतायामस्त्राणि निर्जितजगन्ति किमर्पितानि ॥ ५ ॥

भ्रूचापे निहितः कटाक्षविशिखो निर्मातु मर्मव्यथां
श्यामात्मा कुटिलः करोतु कबरीभारोऽपि मारोद्यमम् ॥
मोहं तावदयं च तन्वि तनुतां बिम्बाधरो रागवान्
सद्वृत्तः स्तनमण्डलस्तव कथं प्राणैर्मम क्रीडति ॥ ६ ॥

तानि स्पर्शसुखानि ते च तरलाः स्निग्धा दृशोर्विभ्रमा-
स्तद्वक्त्राम्बुजसौरभं स च सुधास्यन्दी गिरां वक्रिमा ॥
सा बिम्बाधरमाधुरीति विषयासङ्गेऽपि मन्मानसं
तस्यां लग्नसमाधि हन्त विरहव्याधिः कथं वर्तते ॥ ७ ॥

तिर्यक्कण्ठविलोलमौलितरलोत्तंसस्य वंशोच्चर-
द्गीतस्थानकृतावधानललनालक्षैर्न संलक्षिताः ॥
संमुग्धं मधुसूदनस्य मधुरे राधामुखेन्दौ मृदु-
स्पन्दं कन्दलिताश्चिरं ददतु वः क्षेमं कटाक्षोर्मयः ॥ ८ ॥

**इति श्रीगीतगोविन्दे मुग्धमधुसूदनो नाम**

**तृतीयः सर्गः ।**

# चतुर्थः सर्गः ।

यमुनातीरवानीरनिकुञ्जे मन्दमास्थितम् ॥
प्राह प्रेमभरोद्भ्रान्तं माधवं राधिकासखी ॥ १ ॥

**( अथ अष्टमप्रबन्धो कर्णाटकरागेण एकतालीताले गीयते । )**

सा विरहे तव दीना । माधव मनसिजविशिखभयादिव
भावनया त्वयि लीना ॥ध्रु०॥

निन्दति चन्दनमिन्दुकिरणमनुविन्दति खेदमधीरम् ।
व्यालनिलयमिलनेन गरलमिव कलयति मलयसमीरम् ॥१॥

अविरलनिपतितमदनशरादिव भवदवनाय विशालम् ।
स्वहृदयमर्मणि वर्म करोति सजलनलिनीदलजालम् ॥२॥

कुसुमविशिखशरतल्पमनल्पविलासकलाकमनीयम्
व्रतमिव तव परिरम्भसुखाय करोति कुसुमशयनीयम् ॥३॥

वहति चलितविलोचनजलधरमाननकमलमुदारम् ।
विधुमिव विकटविधुन्तुददन्तदलनगलितामृतधारम् ॥४॥

विलिखति रहसि कुरङ्गमदेन भवन्तमसमशरभूतम् ।
प्रणमति मकरमधो विनिधाय करे च शरं नवचूतम् ॥५॥

प्रतिपदमिदमपि निगदति माधव तव चरणे पतिताहम् ।
त्वयि विमुखे मयि सपदि सुधानिधिरपि तनुते तनुदाहम् ॥६॥

ध्यानलयेन पुरः परिकल्प्य भवन्तमतीव दुरापम् ।
विलपति हसति विषीदति रोदिति चञ्चति मुञ्चति तापम् ॥७॥

श्रीजयदेवभणितमिदमधिकं यदि मनसा नटनीयम् ।
हरिविरहाकुलबल्लवयुवतिसखीवचनं पठनीयम् ॥८॥

**( इति अष्टमः प्रबन्धः । )**

आवासो विपिनायते प्रियसखीमालापि जालायते
तापोऽपि श्वसितेन दावदहनज्वालाकलापायते ॥
सापि त्वद्विरहेण हन्त हरिणीरूपायते हा कथं
कन्दर्पोऽपि यमायते विरचयञ्छार्दूलविक्रीडितम् ॥२॥

**( अथ नवमप्रबन्धो देशाखरागेण एकतालीताले गीयते । )**

राधिका तव विरहे केशव ॥ध्रु०॥

स्तनविनिहितमपि हारमुदारम् ।
सा मनुते कृशतनुरिव भारम् ॥१॥

सरसमसृणमपि मलयजपङ्कम् ।
पश्यति विषमिव वपुषि सशङ्कम् ॥२॥

श्वसितपवनमनुपमपरिणाहम् ।
मदनदहनमिव वहति सदाहम् ॥३॥

दिशि दिशि किरति सजलकणजालम् ।
नयननलिनमिव विगलितनालम् ॥४॥

नयनविषयमपि किसलयतल्पम् ।
कलयति विहितहुताशविकल्पम् ॥५॥

त्यजति न पाणितलेन कपोलम् ।
बालशशिनमिव सायमलोलम् ॥६॥

हरिरिति हरिरिति जपति सकामम् ।
विरहविहितमरणेव निकामम् ॥७॥

श्रीजयदेवभणितमिति गीतम् ।
सुखयतु केशवपदमुपनीतम् ॥८॥

**( इति नवमः प्रबन्धः । )**

सा रोमाञ्चति सीत्करोति विलपत्युत्कम्पते ताम्यति
ध्यायत्युद्भ्रमति प्रमीलति पतत्युद्याति मूर्च्छत्यपि ॥
एतावत्यतनुज्वरे वरतनुर्जीवेन्न किं ते रसात्
स्वर्वैद्यप्रतिम प्रसीदसि यदि त्यक्तोऽन्यथा हस्तकः ॥३॥

स्मरातुरां दैवतवैद्यहृद्य त्वदङ्गसङ्गामृतमात्रसाध्याम् ॥
विमुक्तबाधां कुरुषे न राधामुपेन्द्र वज्रादपि दारुणोऽसि ॥४॥

कन्दर्पज्वरसंज्वराकुलतनोराश्चर्यमस्याश्चिरं
चेतश्चन्दनचन्द्रमःकमलिनीचिन्तासु संताम्यति ॥
किंतु क्षान्तिवशेन शीतलतनुं त्वामेवमेकं प्रियं
ध्यायन्ती रहसि स्थिता कथमसौ क्षीणा क्षणं प्राणिति ॥५॥

क्षणमपि विरहः पुरा न सेहे नयननिमीलनखिन्नया यया ते ॥
श्वसिति कथमसौ रसालशाखां चिरविरहेण विलोक्य पुष्पिताग्राम् ॥६॥

वृष्टिव्याकुलगोकुलावनरसादुद्धृत्य गोवर्धनं
बिभ्रद्बल्लवसुन्दरीभिरधिकानन्दाच्चिरं चुम्बितः ॥
कन्दर्पेण तदर्पिताधरतटीसिन्दूरमुद्राङ्कितो
बाहुर्गोपतनोस्तनोतु भवतः श्रेयांसि कंसद्विषः ॥७॥

**इति श्रीगीतगोविन्दे स्निग्धमाधवो नाम**
**चतुर्थः सर्गः ।**

# पञ्चमः सर्गः ।



अहमिह निवसामि याहि राधामनुनय मद्वचनेन चानयेथाः ॥
इति मधुरिपुणा सखी नियुक्ता स्वयमिदमेत्य पुनर्जगाद राधाम् ॥१॥

**( अथ दशमप्रबन्धो वराडीरागेण रूपकताले गीयते । )**

तव विरहे वनमाली सखि सीदति ॥ध्रु०॥

वहति मलयसमीरे मदनमुपनिधाय ।
स्फुटति कुसुमनिकरे विरहिहृदयदलनाय ॥१॥

दहति शिशिरमयूखे मरणमनुकरोति ।
पतति मदनविशिखे विलपति विकलतरोऽति ॥२॥

ध्वनति मधुपसमूहे श्रवणमपिदधाति ।
मनसि वलितविरहे निशि निशि रुजमुपयाति ॥३॥

वसति विपिनविताने त्यजति ललितमपि धाम ।
लुठति धरणिशयने बहु विलपति तव नाम ॥४॥

भणति कविजयदेव इति विरहविलसितेन ।
मनसि रभसविभवे हरिरुदयतु सुकृतेन ॥५॥

**( इति दशमः प्रबन्धः । )**

पूर्वं यत्र समं त्वया रतिपतेरासादिताः सिद्धय-
स्तस्मिन्नेव निकुञ्जमन्मथमहातीर्थे पुनर्माधवः ॥
ध्यायंस्त्वामनिशं जपन्नपि तवैवालापमन्त्रावलिं
भूयस्त्वत्कुचकुम्भनिर्भरपरीरम्भामृतं वाञ्छति ॥२॥

( अथ एकादशप्रबन्धः केदाररागेण एकतालीताले गीयते । )

धीरसमीरे यमुनातीरे वसति वने वनमाली ।
गोपीपीनपयोधरमर्दनचञ्चलकरयुगशाली ॥ध्रु०॥

रतिसुखसारे गतमभिसारे मदनमनोहरवेषम् ।
न कुरु नितम्बिनि गमनविलम्बनमनुसर तं हृदयेशम् ॥१॥

नामसमेतं कृतसंकेतं वादयते मृदुवेणुम् ।
बहु मनुते ननु ते तनुसंगतपवनचलितमपि रेणुम् ॥२॥

पतति पतत्रे विचलति पत्रे शङ्कितभवदुपयानम् ।
रचयति शयनं सचकितनयनं पश्यति तव पन्थानम् ॥३॥

मुखरमधीरं त्यज मञ्जीरं रिपुमिव केलिसुलोलम् ।
चल सखि कुञ्जं सतिमिरपुञ्जं शीलय नीलनिचोलम् ॥४॥

उरसि मुरारेरुपहितहारे घन इव तरलबलाके ।
तडिदिव पीते रतिविपरीते राजसि सुकृतविपाके ॥५॥

विगलितवसनं परिहृतरशनं घटय जघनमपिधानम् ।
किसलयशयने पङ्कजनयने निधिमिव हर्षनिदानम् ॥६॥

हरिरभिमानी रजनिरिदानीमियमपि याति विरामम् ।
कुरु मम वचनं सत्वररचनं पूरय मधुरिपुकामम् ॥७॥

श्रीजयदेवे कृतहरिसेवे भणति परमरमणीयम् ।
प्रमुदितहृदयं हरिमतिसदयं नमत सुकृतकमनीयम् ॥८॥

( इति एकादशः प्रबन्धः । )

विकिरति मुहुः श्वासानाशाः पुरो मुहुरीक्षते ।
प्रविशति मुहुः कुञ्जं गुञ्जन् मुहुर्बहु ताम्यति ॥

रचयति मुहुः शय्यां पर्याकुलं मुहुरीक्षते
मदनकदनक्लान्तः कान्ते प्रियस्तव वर्तते ॥३॥

त्वद्वाक्येन समं समग्रमधुना तिग्मांशुरस्तं गतो
गोविन्दस्य मनोरथेन च समं प्राप्तं तमः सान्द्रताम् ॥
कोकानां करुणस्वनेन सदृशी दीर्घा मदभ्यर्थना
तन्मुग्धे विफलं विलम्बनमसौ रम्योऽभिसारक्षणः ॥४॥

आश्लेषादनु चुम्बनादनु नखोल्लेखादनु स्वान्तजात्
प्रोद्बोधादनु संभ्रमादनु रतारम्भादनु प्रीतयोः ॥
अन्यार्थं गतयोर्भ्रमान्मिलितयोः संभाषणैर्जानतो-
र्दम्पत्योर्निशि को न को न तमसि व्रीडाविमिश्रो रसः ॥५॥

सभयचकितं विन्यस्यन्तीं दृशं तिमिरे पथि
प्रतितरु मुहुः स्थित्वा मन्दं पदानि वितन्वतीम् ॥
कथमपि रहः प्राप्तामङ्गैरनङ्गतरङ्गिभिः
सुमुखि सुभगः पश्यन् स त्वामुपैतु कृतार्थताम् ॥६॥

राधामुग्धमुखारविन्दमधुपस्त्रैलोक्यमौलिस्थली-
नेपथ्योचितनीलरत्नमवनीभारावतारक्षमः ॥
स्वच्छन्दं व्रजसुन्दरीजनमनस्तोषप्रदोषश्चिरम्
कंसध्वंसनधूमकेतुरवतु त्वां देवकीनन्दनः ॥७॥

**इति श्रीगीतगोविन्दे साकाङ्क्षपुण्डरीकाक्षो नाम**
**पञ्चमः सर्गः ।**

# षष्ठः सर्गः ।



अथ तां गन्तुमशक्तां चिरमनुरक्तां लतागृहे दृष्ट्वा ॥
तच्चरितं गोविन्दे मनसिजमन्दे सखी प्राह ॥१॥

**( अथ द्वादशप्रबन्धो गुणकरीरागेण रूपकताले गीयते । )**

नाथ हरे जय नाथ हरे ; सीदति राधा वासगृहे॥ ध्रु०॥

पश्यति दिशि दिशि रहसि भवन्तम् ।
त्वदधरमधुरमधूनि पिबन्तम् ॥१॥

त्वदभिसरणरभसेन वलन्ती ।
पतति पदानि कियन्ति चलन्ती ॥२॥

विहितविशदबिसकिसलयवलया ।
जीवति परमिह तव रतिकलया ॥३॥

मुहुरवलोकितमण्डनलीला ।
मधुरिपुरहमिति भावनशीला ॥४॥

त्वरितमुपैति न कथमभिसारम् ।
हरिरिति वदति सखीमनुवारम् ॥५॥

श्लिष्यति चुम्बति जलधरकल्पम् ।
हरिरुपगत इति तिमिरमनल्पम् ॥६॥

भवति विलम्बिनि विगलितलज्जा ।
विलपति रोदिति वासकसज्जा ॥७॥

श्रीजयदेवकवेरिदमुदितम् ।
　　रसिकजनं तनुतामतिमुदितम् ॥८॥

**( इति द्वादशः प्रबन्धः । )**

विपुलपुलकपालिः स्फीतसीत्कारमन्त-
　　र्जनितजडिमकाकुव्याकुलं व्याहरन्ती ॥
तव कितव विधायामन्दकन्दर्पचिन्तां
　　रसजलनिधिमग्ना ध्यानलग्ना मृगाक्षी ॥२॥

अङ्गेष्वाभरणं करोति बहुशः पत्रेऽपि संचारिणि
　　प्राप्तं त्वां परिशङ्कते वितनुते शय्यां चिरं ध्यायति ॥
इत्याकल्पविकल्पतल्परचनासंकल्पलीलाशत-
　　व्यासक्तापि विना त्वया वरतनुर्नैषा निशां नेष्यति ॥३॥

किं विश्राम्यसि कृष्णभोगिभवने भाण्डीरभूमीरुहि
　　भ्रातर्यासि न दृष्टिगोचरमितः सानन्दनन्दास्पदम् ॥
राधाया वचनं तदध्वगमुखान्नन्दान्तिके गोपतो
　　गोविन्दस्य जयन्ति सायमतिथिप्राशस्त्यगर्भा गिरः ॥४॥

**इति श्रीगीतगोविन्दे सोत्कण्ठवैकुण्ठो नाम**
**षष्ठः सर्गः ।**

## सप्तमः सर्गः ।

अत्रान्तरे च कुलटाकुलवर्त्मपात-
संजातपातक इव स्फुटलाञ्छनश्रीः ॥
वृन्दावनान्तरमदीपयदंशुजालै-
र्दिक्सुन्दरीवदनचन्दनबिन्दुरिन्दुः ॥१॥

प्रसरति शशधरबिम्बे विहितविलम्बे च माधवे मधुरा ॥
विरचितविविधविलापं सा परितापं चकारोच्चैः ॥२॥

**( अथ त्रयोदशप्रबन्धो गौडमालवरागेण प्रतिमठताले गीयते । )**

यामि हे कमिह शरणं सखीजनवचनवञ्चिता ॥ध्रु०॥

कथितसमयेऽपि हरिरहह न ययौ वनम् ।
मम विफलमेतदनुरूपमपि यौवनम् ॥१॥

यदनुगमनाय निशि गहनपि शीलितम् ।
तेन मम हृदयमिदमसमशरकीलितम् ॥२॥

मम मरणमेव वरमतिवितथकेतना ।
किमिति विषहामि विरहानलमचेतना ॥३॥

मामहह विधुरयति मधुरमधुयामिनी ।
कापि हरिमनुभवति कृतसुकृतकामिनी ॥४॥

अहह कलयामि वलयादिमणिभूषणम् ।
हरिविरहदहनवहनेन बहुदूषणम् ॥५॥

कुसुमसुकुमारतनुमतनुशरलीलया ।
स्रगपि हृदि हन्ति मामतिविषमशीलया ॥६॥

अहमिह निवसामि न गणितवनवेतसा ।
स्मरति मधुसूदनो मामपि न चेतसा ॥७॥
हरिचरणशरणजयदेवकविभारती ।
वसतु हृदि युवतिरिव कोमलकलावती ॥८॥

( इति त्रयोदशः प्रबन्धः । )

तत्किं कामपि कामिनीमभिसृतः किं वा कलाकेलिभि-
र्बद्धो बन्धुभिरन्धकारिणि वनोपान्ते किमु भ्राम्यति ॥
कान्तः क्लान्तमना मनागपि पथि प्रस्थातुमेवाक्षमः
संकेतीकृतमञ्जुवञ्जुललताकुञ्जेऽपि यन्नागतः ॥३॥

अथागतां माधवमन्तरेण सखीमियं वीक्ष्य विषादमूकाम् ।
विशङ्कमाना रमितं कयापि जनार्दनं दृष्टवदेतदाह ॥४॥

( अथ चतुर्दशप्रबन्धो वसन्तरागेण एकतालीताले गीयते । )

कापि चपला मधुरिपुणा । विलसति युवतिरधिकगुणा ॥ध्रु०॥
स्मरसमरोचितविरचितवेषा । गलितकुसुमदलविलुलितकेशा ॥१॥
हरिपरिरम्भणवलितविकारा । कुचकलशोपरि तरलितहारा ॥२॥
विचलदलकललिताननचन्द्रा । तदधरपानरभसकृततन्द्रा ॥३॥
चञ्चलकुण्डलदलितकपोला । मुखरितरशनजघनगतिलोला ॥४॥
दयितविलोकितलज्जितहसिता । बहुविधकूजितरतिरसरसिता ॥५॥
विपुलपुलकपृथुवेपथुभङ्गा । श्वसितनिमीलितविकसदनङ्गा ॥६॥
श्रमजलकणभरसुभगशरीरा । परिपतितोरसि रतिरणधीरा ॥७॥
श्रीजयदेवभणितहरिरमितम् । कलिकलुषं जनयतु परिशमितम् ॥८॥

( इति चतुर्दशः प्रबन्धः । )

विरहपाण्डुमुरारिमुखाम्बुजद्युतिरयं तिरयन्नपि वेदनाम् ॥
विधुरतीव तनोति मनोभुवः सुहृदये हृदये मदनव्यथाम् ॥ ५ ॥

( अथ पञ्चदशप्रबन्धो गुर्जरीरागेण एकतालीताले गीयते । )

रमते यमुनापुलिनवने विजयी मुरारिरधुना ॥ ध्रु० ॥

समुदितमदने रमणीवदने चुम्बनवलिताधरे ।
मृगमदतिलकं लिखति सपुलकं मृगमिव रजनीकरे ॥ १ ॥

घनचयरुचिरे रचयति चिकुरे तरलिततरुणानने ।
कुरबककुसुमं चपलासुषमं रतिपतिमृगकानने ॥ २ ॥

घटयति सुघने कुचयुगगगने मृगमदरुचिरूषिते ।
मणिसरममलं तारकपटलं नखपदशशिभूषिते ॥ ३ ॥

जितबिसशकले मृदुभुजयुगुले करतलनलिनीदले ।
मरकतवलयं मधुकरनिचयं वितरति हिमशीतले ॥ ४ ॥

रतिगृहजघने विपुलापघने मनसिजकनकासने ।
मणिमयरशनं तोरणहसन विकिरति कृतवासने ॥ ५ ॥

चरणकिसलये कमलानिलये नखमणिगणपूजिते ।
बहिरपवरणं यावकभरणं जनयति हृदि योजिते ॥ ६ ॥

रमयति सुदृशं कामपि सदृशं खलहलधरसोदरे ।
किमफलमवसं चिरमिह विरसं वद सखि विटपोदरे ॥ ७ ॥

इह रसभणने कृतहरिगुणने मधुरिपुपदसेवके ।
कलियुगचरितं न वसतु दुरितं कविनृपजयदेवके ॥ ८ ॥

( इति पञ्चदशः प्रबन्धः । )

नायातः सखि निर्दयो यदि शठस्त्वं दूति किं दूयसे
स्वच्छन्दं बहुवल्लभः स रमते किं तत्र ते दूषणम् ॥
पश्याद्य प्रियसङ्गमाय दयितस्याकृष्यमाणं गुणै–
रुत्कण्ठार्तिभरादिव स्फुटदिदं चेतः स्वयं यास्यति ॥ ६ ॥

( अथ षोडशप्रबन्धो देशाङ्करागेण रूपकताले गीयते । )

सखि या रमिता वनमालिना ॥ ध्रु० ॥

अनिलतरलकुवलयनयनेन । तपति न सा किसलयशयनेन ॥ १ ॥
विकसितसरसिजललितमुखेन । स्फुटति न सा मनसिजविशिखेन ॥२॥
अमृतमधुरमृदुतरवचनेन । ज्वलति न सा मलयजपवनेन ॥ ३ ॥
स्थलजलरुहरुचिकरचरणेन । लुठति न सा हिमकरकिरणेन ॥ ४ ॥
सजलजलदसमुदयरुचिरेण । दलति न सा हृदि चिरविरहेण ॥ ५ ॥
कनकनिकषरुचिशुचिवसनेन । श्वसिति न सा परिजनहसनेन ॥ ६ ॥
सकलभुवनजनवरतरुणेन । वहति न सा रुजमतिकरुणेन ॥ ७ ॥
श्रीजयदेवभणितवचनेन । प्रविशतु हरिरपि हृदयमनेन ॥ ८ ॥

( इति षोडशः प्रबन्धः । )

मनोभवानन्दनचन्दनानिल प्रसीद रे दक्षिण मुञ्च वामताम् ॥
क्षणं जगत्प्राण विधाय माधवं पुरो मम प्राणहरो भविष्यसि ॥१॥

रिपुरिव सखीसंवासोऽयं शिखीव हिमानिलो
विषमिव सुधारश्मिर्दूरं दुनोति मनोगमम् ॥
हृदयमदये तस्मिन्नेवं पुनर्वलते बलात्
कुवलयदृशां वामः कामो निकामनिरङ्कुशः ॥ ७ ॥

बाधां विधेहि मलयानिल पञ्चबाण प्राणान् गृहाण न गृहं पुनराश्रयिष्ये ॥
किं ते कृतान्तभगिनि क्षमया तरङ्गैरङ्गानि सिञ्च मम शाम्यतु देहदाहः ॥८॥

सान्द्रानन्दपुरन्दरादिदिविषद्वृन्दैरमन्दादरा–
दानम्रैर्मुकुटेन्द्रनीलमणिभिः सन्दर्शितेन्दीवरम् ॥
स्वच्छन्दं मकरन्दसुन्दरगलन्मन्दाकिनीमेदुरं
श्रीगोविन्दपदारविन्दमशुभस्कन्दाय वन्दामहे ॥ ९ ॥

इति श्रीगीतगोविन्दे नागरनारायणो नाम
सप्तमः सर्गः ।

# अष्टमः सर्गः ।



अथ कथमपि यामिनीं निनीय स्मरशरजर्जरितापि सा प्रभाते ॥
अनुनयवचनं वदन्तमग्रे प्रणतमपि प्रियमाह साभ्यसूयम् ॥ १ ॥

**( अथ सप्तदशप्रबन्धो भैरवरागेण रूपकताले गीयते । )**

हरिहरि याहि माधव याहि केशव मा वद कैतववादम् ।
तामनुसर सरसीरुहलोचन या तव हरति विषादम् ॥ ध्रु० ॥

रजनिजनितगुरुजागररागकषायितमलसानिमेषम् ।
वहति नयनमनुरागमिव स्फुटमुदितरसाभिनिवेशम् ॥ १ ॥

कज्जलमलिनविलोचनचुम्बनविरचितनीलिमरूपम् ।
दशनवसनमरुणं तव कृष्ण तनोति तनोरनुरूपम् ॥ २ ॥

वपुरनुवहति तव स्मरसङ्गरखरनखरक्षतरेखम् ।
मरकतशकलकलितकलधौतलिपेरिव रतिजयलेखम् ॥ ३ ॥

चरणकमलगलदलक्तकसिक्तमिदं तव हृदयमुदारम् ।
दर्शयतीव बहिर्मदनद्रुमनवकिसलयपरिवारम् ॥ ४ ॥

दशनपदं भवदधरगतं मम जनयति चेतसि खेदम् ।
कथयति कथमधुनापि मया सह तव वपुरेतदभेदम् ॥ ५ ॥

बहिरिव मलिनतरं तव कृष्ण मनोऽपि भविष्यति नूनम् ।
कथमथ वञ्चयसे जनमनुगतमसमशरज्वरदूनम् ॥ ६ ॥

भ्रमति भवानबलाकवलाय वनेषु किमत्र विचित्रम् ।
प्रथयति पूतनिकैव वधूवधनिर्दयबालचरित्रम् ॥ ७ ॥

श्रीजयदेवभणितरतिवञ्चितखण्डितयुवतिविलापम् ।
शृणुत सुधामधुरं विबुधा विबुधालयतोऽपि दुरापम् ॥ ८ ॥

( इति सप्तदशः प्रबन्धः । )

तवेदं पश्यन्त्याः प्रसरदनुरागं बहिरिव
प्रियापादालक्तच्छुरितमरुणद्योति हृदयम् ॥
ममाद्य प्रख्यातप्रणयभरभङ्गेन कितव
त्वदालोकः शोकादपि किमपि लज्जां जनयति ॥ २ ॥

प्रातर्नीलनिचोलमच्युतमुरः संवीतपीतांशुकं
राधायाश्चकितं विलोक्य हसति स्वैरं सखीमण्डले ॥
व्रीडाचञ्चलमञ्चलं नयनयोराधाय राधानने
स्वादुस्मेरमुखोऽयमस्तु जगदानन्दाय नन्दात्मजः ॥ ३ ॥

इति श्रीगीतगोविन्दे विलक्षलक्ष्मीपतिर्नाम
अष्टमः सर्गः ।

# नवमः सर्गः ।



अथ तां मन्मथखिन्नां रतिरसभिन्नां विषादसम्पन्नाम् ॥
अनुचिन्तितहरिचरितां कलहान्तरितामुवाच रहसि सखी ॥ १ ॥

**( अथ अष्टादशप्रबन्धो गुर्जरीरागेण यतिताले गीयते । )**

माधवे मा कुरु मानिनि मानमये ॥ ध्रु० ॥

हरिरभिसरति वहति मधुपवने ।
किमपरमधिकसुखं सखि भवने ॥ १ ॥

तालफलादपि गुरुमतिसरसं ।
किं विफलीकुरुषे कुचकलशम् ॥ २ ॥

कति न कथितमिदमनुपदमाचिरम् ।
मा परिहर हरिमतिशयरुचिरम् ॥ ३ ॥

किमिति विषीदसि रोदिषि विकला ।
विहसति युवतिसभा तव सकला ॥ ४ ॥

मृदुनलिनीदलशीतलशयने ।
हरिमवलोकय सफलय नयने ॥ ५ ॥

जनयसि मनसि किमिति गुरुखेदम् ।
शृणु मम वचनमनीहितभेदम् ॥ ६ ॥

हरिरुपयातु वदतु बहुमधुरम् ।
किमिति करोषि हृदयमतिविधुरम् ॥ ७ ॥

श्रीजयदेवभणितमतिललितम् ।
सुखयतु रसिकजनं हरिचरितम् ॥ ८ ॥

**( इति अष्टादशः प्रबन्धः । )**

स्निग्धे यत्परुषासि यत्प्रणमति स्तब्धासि यद्रागिणि
द्वेषस्थासि यदुन्मुखे विमुखतां यातासि तस्मिन् प्रिये ॥
तद्युक्तं विपरीतकारिणि तव श्रीखण्डचर्चा विषं
शीतांशुस्तपनो हिमं हुतवहः क्रीडामुदो यातनाः ॥ २ ॥

अन्तर्मोहनमौलिघूर्णनवलन्मन्दारविस्रंसन–
स्तब्धाकर्षणदृष्टिहर्षणमहामन्त्रः कुरङ्गीदृशाम् ॥
दृप्यद्दानवदूयमानदिविषद्दुर्वारदुःखापदां
भ्रंशः कंसरिपोर्व्यपोहयतु वोऽश्रेयांसि वंशीरवः ॥ ३ ॥

इति श्रीगीतगोविन्दे मुग्धमुकुन्दवदनो नाम
नवमः सर्गः।

# दशमः सर्गः ।

अत्रान्तरेऽमसृणरोषवशामसीमानिःश्वासनिःसहमुखीं सुमुखीमुपेत्य ॥
सव्रीडमीक्षितसखीवदनां दिनान्ते सानन्दगद्गदपदं हरिरित्युवाच ॥१॥

( अथ एकोनविंशप्रबन्धो देशवराडीरागेण अष्टतालीताले गीयते । )

प्रिये चारुशीले प्रिये चारुशीले मुञ्च मयि मानमनिदानम् ।
सपदि मदनानलो दहति मम मानसं देहि मुखकमलमधुपानम् ॥ध्रु०॥

वदसि यदि किञ्चिदपि दन्तरुचिकौमुदी हरति दरतिमिरमतिघोरम् ।
स्फुरदधरसीधवे तव वदनचन्द्रमा रोचयति लोचनचकोरम् ॥१॥

सत्यमेवासि यदि सुदति मयि कोपिनी देहि खरनखरशरघातम् ।
घटय भुजबन्धनं जनय रदखण्डनं येन वा भवति सुखजातम् ॥२॥

त्वमसि मम भूषणं त्वमसि मम जीवनं त्वमसि मम भवजलधिरत्नम् ।
भवतु भवतीह मयि सततमनुरोधिनी तत्र मम हृदयमतियत्नम् ॥३॥

नीलनलिनाभमपि तन्वि तव लोचनं धारयति कोकनदरूपम् ।
कुसुमशरबाणभावेन यदि रञ्जयसि कृष्णमिदमेतदनुरूपम् ॥४॥

स्फुरतु कुचकुम्भयोरुपरि मणिमञ्जरी रञ्जयतु तव हृदयदेशम् ।
रसतु रशनापि तव घनजघनमण्डले घोषयतु मन्मथनिदेशम् ॥५॥

स्थलकमलगञ्जनं मम हृदयरञ्जनं जनितरतिरङ्गपरभागम् ।
भण मसृणवाणि करवाणि चरणद्वयं सरसलसदलक्तकसुरागम् ॥६॥

स्मरगरलखण्डनं मम शिरसि मण्डनं देहि पदपल्लवमुदारम् ।
ज्वलति मयि दारुणो मदनकदनानलो हरतु तदुपाहितविकारम् ॥७॥

इति चटुलचाटुपटुचारु मुरवैरिणो राधिकामधिवचनजातम् ।
जयति जयदेवकविभारतीभूषितम् मानिनीजनजनितशातम् ॥८॥

( इति एकोनविंशः प्रबन्धः । )

परिहर कृतातङ्के शङ्कां त्वया सततं घन-
स्तनजघनयाक्रान्ते स्वान्ते परानवकाशिनि ॥
विशति वितनोरन्यो धन्यो न कोऽपि ममान्तरं
स्तनभरपरीरम्भारम्भे विधेहि विधेयताम् ॥२॥
मुग्धे विधेहि मयि निर्दयदन्तदंशं दोर्वल्लिबन्धनिबिडस्तनपीडनानि ॥
चण्डि त्वमेव मुदमञ्चय पञ्चबाणचण्डालकाण्डदलनादसवः प्रयान्ति ॥३॥
शशिमुखि तव भाति भङ्गुरभ्रूर्युवजनमोहकरालकालसर्पी ॥
तदुदितभयभञ्जनाय यूनां त्वदधरसीधुसुधैव सिद्धमन्त्रः ॥४॥
व्यथयति वृथा मौनं तन्वि प्रपञ्चय पञ्चमं
तरुणि मधुरालापैस्तापं विनोदय दृष्टिभिः ॥
सुमुखि विमुखीभावं तावद्विमुञ्च न वञ्चय
स्वयमतिशयस्निग्धो मुग्धे प्रियोऽहमुपस्थितः ॥५॥
बन्धूकद्युतिबान्धवोऽयमधरः स्निग्धो मधूकच्छवि-
र्गण्डश्चण्डि चकास्ति नीलनलिनश्रीमोचनं लोचनम् ॥
नासाभ्येति तिलप्रसूनपदवीं कुन्दाभदन्ति प्रिये
प्रायस्त्वन्मुखसेवया विजयते विश्वं स पुष्पायुधः ॥६॥
दृशौ तव मदालसे वदनमिन्दुमत्यान्वितं
गतिर्जनमनोरमा विधुतरम्भमूरुद्वयम् ॥
रतिस्तव कलावती रुचिराचित्रलेखे भ्रुवा-
वहो विबुधयौवतं वहसि तन्वि पृथ्वीगता ॥७॥
प्रीतिं वस्तनुतां हरिः कुवलयापीडेन सार्धं रणे
राधापीनपयोधरस्मरणकृत्कुम्भेन सम्भेदवान् ॥
यत्र बिभ्यति मीलति क्षणमपि क्षिप्रं तदालोकना-
द्व्यामोहेन जितं जितं जितमभूद्व्यालोलकोलाहलः ॥८॥

**इति श्रीगीतगोविन्दे चतुरचतुर्भुजो नाम**
**दशमः सर्गः ।**

# एकादशः सर्गः ।



रुचिरमनुनयेन प्रीणयित्वा मृगाक्षीं गतवति कृतवेषे केशवे कुञ्जशय्याम् ।
रचितरुचिरभूषां दृष्टिमोषे प्रदोषे स्फुरति निरवसादां काऽपि राधां जगाद १

**( अथ विंशप्रबन्धो वसन्तरागेण रूपकताले गीयते । )**

मुग्धे मधुमथनमनुगतमनुसर राधिके ॥ध्रु०॥

विरचितचाटुवचनरचनं चरणरचितप्रणिपातम् ।
संप्रति मञ्जुलवञ्जुलसीमनि केलिशयनमनुयातम् ॥१॥

घनजघनस्तनभारभरे दरमन्थरचरणविहारम् ।
मुखरितमणिमञ्जीरमुपैहि विधेहि मरालविकारम् ॥२॥

शृणु रमणीयतरं तरुणीजनमोहनमधुरिपुरावम् ।
कुसुमशरासनशासनबन्दिनि पिकनिकरे भज भावम् ॥३॥

अनिलतरलकिसलयनिकरेण करेण लतानिकुरम्बम् ।
प्रेरणमिव करभोरु करोति गतिं प्रति मुञ्च विलम्बम् ॥४॥

स्फुरितमनङ्गतरङ्गवशादिव सूचितहरिपरिरम्भम् ।
पृच्छ मनोहरहारविमलजलधारममुं कुचकुम्भम् ॥५॥

अधिगतमखिलसखीभिरिदं तव वपुरपि रतिरणसज्जम् ।
चण्डि रसितरशनारवडिण्डिममभिसर सरसमलज्जम् ॥६॥

स्मरशरसुभगनखेन करेण सखीमवलम्ब्य सलीलम् ।
चल वलयक्वणितैरवबोधय हरिमपि निजगतिशीलम् ॥७॥

श्रीजयदेवभणितमधरीकृतहारमुदासितवामम् ।
हरिविनिहितमनसामधितिष्ठतु कण्ठतटीमविरामम् ॥८॥

**( इति विंशः प्रबन्धः । )**

सा मां द्रक्ष्यति वक्ष्यति प्रियकथां प्रत्यङ्गमालिङ्गनैः
प्रीतिं यास्यति रंस्यते सखि समागम्येति चिन्ताकुलः ॥
स त्वां पश्यति कम्पते पुलकयत्यानन्दति स्विद्यति
प्रत्युद्गच्छति मूर्च्छति स्थिरतमःपुञ्जे निकुञ्जे प्रियः ॥२॥

अक्ष्णोर्निक्षिपदञ्जनं श्रवणयोस्तापिच्छगुच्छावलिं
मूर्ध्नि श्यामसरोजदाम कुचयोः कस्तूरिकापत्रकम् ॥
धूर्तानामभिसारसत्वरहृदां विष्वङ् निकुञ्जे सखि
ध्वान्तं नीलनिचोलचारु सुदृशां प्रत्यङ्गमालिङ्गति ॥३॥

काश्मीरगौरवपुषामभिसारिकाणामाबद्धरेखमभितो मणिमञ्जरीभिः ॥
एतत्तमालदलनीलतमं तमिस्रं तत्प्रेमहेमनिकषोपलतां तनोति ॥४॥

हारावलीतरलकाञ्चनकाञ्चिदामकेयूरकङ्कणमणिद्युतिदीपितस्य ॥
द्वारे निकुञ्जनिलयस्य हरिं निरीक्ष्य व्रीडावतीमथ सखी निजगाद राधाम् ५

**( अथ एकविंशतितमप्रबन्धो वराडीरागेण आडवताले गीयते । )**

मञ्जुतरकुञ्जतलकेलिसदने । प्रविश राधे माधवसमीपमिह ।
विलस रतिरभसहसितवदने ॥१॥

नवभवदशोकदलशयनसारे । प्रविश राधे माधवसमीपमिह ।
विलस कुचकलशतरलहारे ॥२॥

कुसुमचयरचितशुचिवासगेहे । प्रविश राधे माधवसमीपमिह ।
विलस कुसुमसुकुमारदेहे ॥३॥

मृदुचलमलयपवनसुरभिशीते । प्रविश राधे माधवसमीपमिह ।
विलस रसवलितललितगीते ॥४॥

विततबहुवल्लिनवपल्लवघने । प्रविश राधे माधवसमीपमिह ।
विलस चिरमलसपीनजघने ॥५॥

मधुमिलितमधुपकुलकलितरावे । प्रविश राधे माधवसमीपमिह ।
विलस मदनरसरभसभावे ॥६॥

मधुतरलपिकनिकरनिनदमुखरे । प्रविश राधे माधवसमीपमिह ।
विलस दशनरुचिरुचिरशिखरे ॥७॥

विहितपद्मावतीसुखसमाजे । कुरु मुरारे मङ्गलशतानि ।
भणति जयदेवकविराजराजे ॥८॥

**( इति एकविंशतितमः प्रबन्धः । )**

त्वां चित्तेन चिरं वहन्नयमतिश्रान्तो भृशं तापितः
कन्दर्पेण च पातुमिच्छति सुधासंबाधबिम्बाधरम् ।।
अस्याङ्कं तदलंकुरु क्षणमिह भ्रूक्षेपलक्ष्मीनव–
क्रीते दास इवोपसेवितपदाम्भोजे कुतः संभ्रमः ॥६॥

सा ससाध्वससानन्दं गोविन्दे लोललोचना ।।
सिञ्जाना मञ्जुमञ्जीरं प्रविवेश निवेशनम् ॥७॥

**( अथ द्वाविंशतितमप्रबन्धो वराडीरागेण रूपकताले गीयते । )**

हरिमेकरसं चिरमभिलषितविलासम् ।
सा ददर्श गुरुहर्षवशंवदवदनमनङ्गनिवासम् ॥ध्रु०॥

राधावदनविलोकनविकसितविविधविकारविभङ्गम् ।
जलनिधिमिव विधुमण्डलदर्शनतरलिततुङ्गतरङ्गम् ॥१॥

हारममलतरतारमुरसि दधतं परिलम्बितदूरम् ।
स्फुटतरफेनकदम्बकरम्बितमिव यमुनाजलपूरम् ॥२॥

श्यामलमृदुलकलेवरमण्डनमधिगतगौरदुकूलम् ।
नीलनलिनमिव पीतपरागपटलभरवलयितमूलम् ॥३॥

तरलदृगञ्चलचलनमनोहरवदनजनितरतिरागम् ।
स्फुटकमलोदरखेलितखञ्जनयुगमिव शरदि तडागम् ॥४॥

वदनकमलपरिशीलनमीलितमिहिरसमकुण्डलशोभम् ।
स्मितरुचिरुचिरसमुल्लसिताधरपल्लवकृतरतिलोभम् ॥५॥

शशिकिरणच्छुरितोदरजलधरसुन्दरकुसुमसुकेशम् ।
तिमिरोदितविधुमण्डलनिर्मलमलयजातिलकनिवेशम् ॥६॥

विपुलपुलकभरदन्तुरितं रतिकेलिकलाभिरधीरम् ।
मणिगणकिरणसमूहसमुज्ज्वलभूषणसुभगशरीरम् ॥७॥

श्रीजयदेवभणितविभवाद्विगुणीकृतभूषणभारम् ।
प्रणमत हृदि विनिधाय हरिं भवजलसुकृतोदयसारम् ॥८॥

( इति द्वाविंशतितमः प्रबन्धः । )

अतिक्रम्यापाङ्गं श्रवणपथपर्यन्तगमन-
प्रयासेनेवाक्ष्णोस्तरलतरतारं पतितयोः ॥
इदानीं राधायाः प्रियतमसमालोकसमये
पपात स्वेदाम्बुप्रसर इव हर्षाश्रुनिकरः ॥८॥

भजन्त्यास्तल्पान्तं कृतकपटकण्डूतिपिहित-
स्मितं याते गेहाद्बहिरवहितालीपरिजने ॥
प्रियास्यं पश्यन्त्याः स्मरशरवशाकूतसुभगं
सलज्जाया लज्जा व्यगमदिव दूरं मृगदृशः ॥९॥

जयश्रीविन्यस्तैर्महित इव मन्दारकुसुमैः
स्वयं सिन्दूरेण द्विपरणमुदा मुद्रित इव ॥
भुजापीडक्रीडाहतकुवलयापीडकरिणः
प्रकीर्णासृग्बिन्दुर्जयति भुजदण्डो मुरजितः ॥१०॥

**इति श्रीगीतगोविन्दे सानन्दगोविन्दो नाम**

**एकादशः सर्गः ।**

# द्वादशः सर्गः ।



गतवति सखीवृन्दे मन्दत्रपाभरनिर्भर-
स्मरशरवशाकूतस्फीतास्मितस्नपिताधराम् ॥
सरसमनसं दृष्ट्वा राधां मुहुर्नवपल्लव-
प्रसवशयने विक्षिप्ताक्षीमुवाच हरिः प्रियाम् ॥१॥

**(अथ त्रयोविंशतितमप्रबन्धो विभासरागेण एकतालीताले गीयते।)**

क्षणमधुना नारायणमनुगतमनुसर भो राधिके ॥ध्रु०॥
किसलयशयनतले कुरु कामिनि चरणनलिनविनिवेशम् ।
तव पदपल्लववैरिपराभवमिदमनुभवतु सुवेशम् ॥१॥

करकमलेन करोमि चरणमहमागमितासि विदूरम् ।
क्षणमुपकुरु शयनोपरि मामिव नूपुरमनुगतिशूरम् ॥२॥

वदनसुधानिधिगलितममृतमिव रचय वचनमनुकूलम् ।
विरहमिवापनयामि पयोधररोधकमुरसि दुकूलम् ॥३॥

प्रियपरिरम्भणरभसवलितमिव पुलकितमन्यदुरापम् ।
मदुरसि कुचकलशं विनिवेशय शोषय मनसिजतापम् ॥४॥

अधरसुधारसमुपनय भामिनि जीवय मृतमिव दासम् ।
त्वयि विनिहितमनसं विरहानलदग्धवपुषमविलासम् ॥५॥

शशिमुखि मुखरय मणिरशनागुणमनुगुणकण्ठनिनादम् ।
मम श्रुतियुगुले पिकरवविकले शमय चिरादवसादम् ॥६॥

मामतिविफलरुषा विकलीकृतमवलोकितमधुनेदम् ।
मीलितलज्जितमिव नयनं तव विरम विसृज रतिखेदम् ॥७॥

श्रीजयदेवकवेरिदमनुपदनिगदितमधुरिपुमोदम् ।
जनयतु रसिकजनेषु मनोरमरतिरसभावविनोदम् ॥८॥

( इति त्रयोविंशतितमः प्रबन्धः । )

प्रत्यूहः पुलकाङ्कुरेण निबिडाश्लेषे निमेषेण च
क्रीडाकृतविलोकितेऽधरसुधापाने कथाकेलिभिः ॥
आनन्दाधिगमेन मन्मथकलायुद्धेऽपि यस्मिन्नभू-
दुद्भूतः स तयोर्बभूव सुरतारम्भः प्रियंभावुकः ॥२॥
दोर्भ्यां संयमितः पयोधरभरेणापीडितः पाणिजै-
राविद्धो दशनैः क्षताधरपुटः श्रोणीतटेनाहतः ॥
हस्तेनानमितः कचेऽधरमधुस्यन्देन सम्मोहितः
कान्तः कामपि तृप्तिमाप तदहो कामस्य वामा गतिः ॥३॥
माराङ्के रतिकेलिसङ्कुलरणारम्भे तया साहस-
प्रायं कान्तजयाय किञ्चिदुपरि प्रारम्भि यत्संभ्रमात् ॥
निष्पन्दा जघनस्थली शिथिलिता दोर्वल्लिरुत्कम्पितं
वक्षो मीलितमक्षि पौरुषरसः स्त्रीणां कुतः सिद्ध्यति ॥४॥
तस्याः पाटलपाणिजाङ्कितमुरो निद्राकषाये दृशौ
निर्धूताधरशोणिमा विलुलितस्रस्तस्रजो मूर्धजाः ॥
काञ्चीदाम दरश्लथाञ्चलमिति प्रातर्निखातैर्दृशो-
रेभिः कामशरैस्तदद्भुतमहो पत्युर्मनः कीलितम् ॥५॥
त्वामप्राप्य मयि स्वयंवरपरां क्षीरोदतीरोदरे
शङ्के सुन्दरि कालकूटमपिबन्मूढो मृडानीपतिः ॥
इत्थं पूर्वकथाभिरन्यमनसो निक्षिप्य वामाञ्चलं
राधायाः स्तनकोरकोपरि लसन्नेत्रो हरिः पातु वः ॥६॥
व्यालोलः केशपाशस्तरलितमलकैः स्वेदलोलौ कपोलौ
स्पष्टा दष्टाधरश्रीः कुचकलशरुचा हारिता हारयष्टिः ॥

काञ्ची काञ्चिद्गताशां स्तनजघनपदं पाणिनाच्छाद्य सद्यः
पश्यन्ती चात्मरूपं तदपि विलुलितस्रग्धरेयं धिनोति ॥७॥
ईषन्मीलितदृष्टि मुग्धहसितं सीत्कारधारावशा –
दव्यक्ताकुलकेलिकाकुविकसद्दन्तांशुधौताधरम् ॥
श्वासोत्कम्पिपयोधरोपरि परिष्वङ्गात्कुरङ्गीदृशो
हर्षोत्कर्षविमुक्तनिःसहतनोर्धन्यो धयत्याननम् ॥८॥

अथ सा निर्गताबाधा राधा स्वाधीनभर्तृका ।
निजगाद रतिक्लान्तं कान्तं मण्डनवाञ्छया ॥९॥

अथ सहसा सुप्रीतं सुरतान्ते मानितातिखिन्नाङ्गी ।
राधा जगाद सादरमिदमानन्देन गोविन्दम् ॥१०॥

**( अथ चतुर्विंशतितमप्रबन्धो रामकरीरागेण यतिताले गीयते । )**

निजगाद सा यदुनन्दने क्रीडति हृदयानन्दने ॥ध्रु०॥

कुरु यदुनन्दन चन्दनशिशिरतरेण करेण पयोधरे ।
मृगमदपत्रकमत्र मनोभवमङ्गलकलशसहोदरे ॥१॥
अलिकुलगञ्जनसंजनकं रतिनायकसायकमोचने ।
त्वदधरचुम्बनलम्बितकज्जलमुज्ज्वलय प्रिय लोचने ॥२॥
नयनकुरङ्गतरङ्गविलासनिरोधकरे श्रुतिमण्डले ।
मनसिजपाशविलासधरे शुभवेश निवेशय कुण्डले ॥३॥
भ्रमरचयं रचयन्तमुपरि रुचिरं सुचिरं मम सन्मुखे ।
जितकमले विमले परिकर्मय नर्मजनकमलकं मुखे ॥४॥
मृगमदरसवलितं ललितं कुरु तिलकमलिकरजनीकरे ।
विहितकलङ्ककलं कमलानन विश्रमितश्रमसीकरे ॥५॥
मम रुचिरे चिकुरे कुरु मानद मनसिजध्वजचामरे ।
रतिगलिते ललिते कुसुमानि शिखण्डिशिखण्डकडामरे ॥६॥

सरसघने जघने मम शम्बरदारणवारणकन्दरे ।
मणिरशनावसनाभरणानि शुभाशय वासय सुन्दरे ॥७॥
श्रीजयदेववचसि शुभदे हृदयं सदयं कुरु मण्डने ।
हरिचरणस्मरणामृतनिर्मितकलिकलुषज्वरखण्डने ॥८॥

( इति चतुर्विंशतितमः प्रबन्धः । )

रचय कुचयोः पत्रं चित्रं कुरुष्व कपोलयो-
र्घटय जघने काञ्चीमञ्च स्रजा कबरीभरम् ॥
कलय वलयश्रेणीं पाणौ पदे कुरु नूपुरा-
विति निगदितः प्रीतः पीताम्बरोऽपि तथाकरोत् ॥११॥
पर्यङ्कीकृतनागनायकफणाश्रेणीमणीनां गणे
संक्रान्तप्रतिबिम्बसंकलनया बिभ्रद्वपुर्विक्रियाम् ॥
पादाम्भोरुहधारिवारिधिसुतामक्ष्णां दिदृक्षुः शतैः
कायव्यूहमिवाचरन्नुपचिताकूतो हरिः पातु वः ॥१२॥
यद्गान्धर्वकलासु कौशलमनुध्यानं च यद्वैष्णवं
यच्छृङ्गारविवेकतत्त्वरचनाकाव्येषु लीलायितम् ॥
तत्सर्वं जयदेवपण्डितकवेः कृष्णैकतानात्मनः
सानन्दाः परिशोधयन्तु सुधियः श्रीगीतगोविन्दतः ॥१३॥
श्रीभोजदेवप्रभवस्य राधादेवीसुतश्रीजयदेवकस्य ॥
पराशरादिप्रियवर्गकण्ठे श्रीगीतगोविन्दकवित्वमस्तु ॥१४॥
साध्वी माध्वीक चिन्ता न भवति भवतः शर्करे कर्कशासि
द्राक्षे द्रक्ष्यन्ति के त्वाममृत मृतमसि क्षीर नीरं रसस्ते ॥
माकन्द क्रन्द कान्ताधर धरणितलं गच्छ यच्छन्ति भावं
यावच्छृङ्गारसारस्वतमिह जयदेवस्य विष्वग्वचांसि ॥१५॥

**इति श्रीगीतगोविन्दे प्रीतपीताम्बरो नाम**
**द्वादशः सर्गः ।**

**। इति गीतगोविन्दम् ।**

# सुश्लोकगोविंद व गीतगोविंद यांची अन्योन्यसंबंधसूची

[ सु. = सुश्लोकगोविंद. गी. = गीतगोविंद. प्र. = प्रबंध. क. = कडवें. ]

| सु. | गी. | सु. | गी. | सु. | गी. | सु. | गी. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| सर्ग १ ला | | श्लो. | | श्लो. | | श्लो | |
| श्लो. | | २३ | क. ७ | ४५ | क. ५ | १६ | क ४ |
| १ | -- | २४ | ,, ८ | ४६ | ,, ६ | १७ | ,, ५ |
| २ | श्लो.१ | २५ | ,, ९ | ४७ | ,, ७ | १८ | ,, ६ |
| ३ | ,, २ | २६ | श्लो. ६ | ४८ | ,, ८ | १९ | ,, ७ |
| ४ | ,, ३ | २७ | ,, ७ | ४९ | श्लो. ११ | २० | ,, ८ |
| | प्र.१ला | | प्र ३रा | ५० | ,, १२ | २१ | — |
| ५ | क. १ | २८ | ध्रु. | ५१ | ,, १३ | २२,२३,२४ | श्लो. ३ |
| ६ | ,, २ | २९ | क. १ | सर्ग २ रा. | | २५ | ,, ४ |
| ७ | ,, ३ | ३० | ,, २ | १ | श्लो.१ | २६ | ,, ५ |
| ८ | ,, ४ | ३१ | ,, ३ | | प्र ५वा | सर्ग ३ रा | |
| ९ | ,, ५ | ३२ | ,, ४ | २ | ध्रु. | १ | श्लो १ |
| १० | ,, ६ | ३३ | ,, ५ | ३ | क. १ | २ | ,, २ |
| ११ | ,, ७ | ३४ | ,, ६ | ४ | ,, २ | | प्र.७ वा |
| १२ | ,, ८ | ३५ | ,, ७ | ५ | ,, ३ | ३,४ | ध्रु व क.१ |
| १३ | ,, ९ | ३६ | ,, ८ | ६ | ,, ४ | ५ | क. २ |
| १४ | ,, १० | ३७ | ,, ९ | ७ | ,, ५ | ६ | ,, ३ |
| १५ | ,, ११ | ३८ | ,, ९ | ८ | ,, ६ | ७ | ,, ४ |
| १६ | श्लो. ५ | ३९ | ,, १० | ९ | ,, ७ | ८ | ,, ५ |
| | प्र.२रा | | प्र.४था | १० | ,, ८ | ९ | ,, ६ |
| १७ | क. १ | ४० | ध्रु. | ११ | श्लो. २ | १० | ,, ७ |
| १८ | ,, २ | ४१ | क. १ | | प्र६.वा | ११ | ,, ८ |
| १९ | ,, ३ | ४२ | ,, २ | १३ | क. १ | १२ | श्लो ३ |
| २० | ,, ४ | ४३ | ,, ३ | १४ | ,, २ | १३ | ,, ४ |
| २१ | ,, ५ | ४४ | ,, ४ | १५ | ,, ३ | १४ | ,, ५ |
| २२ | ,, ६ | | | | | | |

| सु. | गी. | सु | गी. | सु. | गी. | सु. | गी. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| श्लो. | | सर्ग ५ वा | | श्लो. | | श्लो. | |
| १५ | श्लो ६ | श्लो.१ | श्लो.१ | ६ | क. ४ | २१ | क. ७ |
| १६ | ,, ७ | | प्र. १०वा | ७ | ,, ५ | २२ | ,, ८ |
| १७ | ,, ८ | २ | ध्रु. | ८ | ,, ६ | २३ | श्लो.५ |
| | | ३ | क. १ | ९ | ,, ७ | | प्र. १५वा |
| सर्ग ४ था | | ४,५ | ,, २ | १० | ,, ८ | २४ | ध्रु. |
| १ | श्लो.१ | ६ | ,, ३ | ११ | श्लो.२ | २५ | क. १ |
| | प्र.८वा | ७,८ | ,, ४ | १२ | ,, ३ | २६ | ,, २ |
| २ | ध्रु. | ९ | ,, ५ | १३ | ,, ४ | २७ | ,, ३ |
| ३ | क. १ | १० | श्लो.२ | सर्ग ७ वा | | २८ | ,, ४ |
| ४ | ,, २ | | प्र.११वा | १ | श्लो.१ | २९ | ,, ५ |
| ५ | ,, ३ | ११ | ध्रु. | २ | ,, २ | ३० | ,, ६ |
| ६ | ,, ४ | १२ | क. १ | | प्र.१३वा | ३१ | ,, ७ |
| ७ | ,, ५ | १३ | ,, २ | ३ | ध्रु. | ३२ | ,, ८ |
| ८ | ,, ६ | १४ | ,, ३ | ४ | क. १ | ३३ | — |
| ९ | ,, ७ | १५ | ,, ४ | ५ | ,, २ | ३४ | श्लो.६ |
| १० | ,, ८ | १६ | ,, ५ | ६ | ,, ३ | | प्र. १६वा |
| ११ | श्लो. २ | १७ | ,, ६ | ७ | ,, ४ | ३५ | ध्रु. |
| | प्र.९वा | १८ | ,, ७ | ८ | ,, ५ | ३६ | क. १ |
| १२ | ध्रुवक १ | १९ | ,, ८ | ९ | ,, ६ | ३७ | ,, २ |
| १३ | क. २ | २० | श्लो.३ | १० | ,, ७ | ३८ | ,, ३ |
| १४ | ,, ३ | २१ | ,, ४ | ११ | ,, ८ | ३९ | ,, ४ |
| १५ | ,, ४ | २२ | ,, ५ | १२ | श्लो.३ | ४० | ,, ५ |
| १६ | ,, ५ | २३ | ,, ६ | १३ | ,, ४ | ४१ | ,, ६ |
| १७ | ,, ६ | २४ | ,, ७ | | प्र.१४वा | ४२ | ,, ७ |
| १८ | ,, ७ | सर्ग ६ वा | | १४ | ध्रु. | ४३ | ,, ८ |
| १९ | ,, ८ | १ | श्लो.१ | १५ | क. १ | ४४ | श्लो.७ |
| २० | श्लो.३ | | प्र.१२वा | १६ | ,, २ | ४५ | ,, ८ |
| २१ | ,, ४ | २ | ध्रु. | १७ | ,, ३ | ४६ | ,, ९ |
| २२ | ,, ५ | ३ | क. १ | १८ | ,, ४ | ४७ | ,, १० |
| २३ | ,, ६ | ४ | ,, २ | १९ | ,, ५ | सर्ग ८ वा | |
| २४ | ,, ७ | ५ | ,, ३ | २० | ,, ६ | १ | श्लो.१ |

| सु. | गी. | सु. | गी. | सु. | गी. | सु. | गी. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| श्लो. | | श्लो. | | श्लो. | | श्लो. | |
| | प्र.१७वा | ४ | क. २ | १६ | क. १ | ७ | क. ४ |
| २ | ध्रु. | ५ | ,, ३ | १७ | ,, २ | ८ | ,, ५ |
| ३ | क. १ | ६ | ,, ४ | १८ | ,, ३ | ९ | ,, ६ |
| ४ | ,, २ | ७ | ,, ५ | १९ | ,, ४ | १० | ,, ७ |
| ५ | ,, ३ | ८ | ,, ६ | २० | ,, ५ | ११ | ,, ८ |
| ६ | ,, ४ | ९ | ,, ७ | २१ | ,, ६ | १२ | श्लो.२ |
| ७ | ,, ५ | १० | ,, ८ | २२ | ,, ७ | १३ | ,, ३ |
| ८ | ,, ६ | ११ | श्लो २ | २३ | ,, ८ | १४ | ,, ४ |
| ९ | ,, ७ | १२ | ,, ३ | २४ | श्लो.६ | १५ | ,, ५ |
| १० | ,, ८ | १३ | ,, ४ | २५ | ,, ७ | १६ | ,, ६ |
| ११ | श्लो २ | १४ | ,, ५ | | प्र २२वा | १७ | ,, ७ |
| १२ | ,, ३ | १५ | ,, ६ | २६ | ध्रु. | १८ | ,, ८ |
| सर्ग ९ वा | | १६ | ,, ७ | २७ | क. १ | १९ | ,, ९ |
| १ | श्लो.१ | १७ | ,, ८ | २८ | ,, २ | २० | ,, १० |
| | प्र.१८वा | सर्ग ११ वा | | २९ | ,, ३ | | प्र २४वा |
| २ | ध्रु. | १,२ | श्लो.१ | ३० | ,, ४ | २१ | क.१ध्रु. |
| ३,४ | क.१ | | प्र.२०वा | ३१ | ,, ५ | २२ | ,, २ |
| ५ | ,, २ | ३ | ध्रु. | ३२ | ,, ६ | २३ | ,, ३ |
| ६ | ,, ३ | ४ | क. १ | ३३ | ,, ७ | २४ | ,, ४ |
| ७ | ,, ४ | ५ | ,, २ | ३४ | ,, ८ | २५ | ,, ५ |
| ८ | ,, ५ | ६ | ,, ३ | ३५ | श्लो.८ | २६ | ,, ६ |
| ९ | ,, ६ | ७ | ,, ४ | ३६ | ,, ९ | २७ | ,, ७ |
| १० | ,, ७ | ८ | ,, ५ | ३७ | ,, १० | २८ | ,, ८ |
| ११ | ,, ८ | ९ | ,, ६ | सर्ग १२ वा | | २९ | श्लो.११ |
| १२ | श्लो.२ | १० | ,, ७ | १ | श्लो.१ | ३० | ,, १२ |
| १३ | ,, ३ | ११ | ,, ८ | | प्र.२३वा | ३१ | ,, १३ |
| सर्ग १० वा | | १२ | श्लो.२ | २,३ | ध्रु. | ३२ | ,, १४ |
| १ | श्लो.१ | १३ | ,, ३ | ४ | क. १ | ३३ | ,, १५ |
| | प्र.१९वा | १४ | ,, ४ | ५ | ,, २ | ३४ | -- |
| २ | ध्रु | १५ | ,, ५ | ६ | ,, ३ | ३५ | — |
| ३ | क. १ | | प्र.२१वा | | | | |

# सुश्लोकगोविंदांतील काव्यालंकारसूची

[ तिरके अंक सर्ग दाखवितात व इतर अंक श्लोक. ]

---

# परिशिष्ट

## १. श्रीजयदेवकवीविषयीं आख्यायिका

[ भक्तकथा प्रेमळ, रसाळ वाणीनें व भाविकपणें गाणारा महाराष्ट्राचा लोकप्रिय कवि महीपति यानें आपल्या 'भक्तिविजय' ग्रथांच्या दुसऱ्या अध्यायांत जयदेवासंबंधीं कथाभाग वर्णन केला आहे. त्याचा सारांश, महीपतीच्याच ओव्या मधून मधून उद्धृत करून येथें जिज्ञासु वाचकासाठीं दिला आहे ]

जगदीशानीं व्यासास जयदेवरूपानें अवतार घ्यावयास आज्ञा केली. तदनुसार 'जगन्नाथक्षेत्रासमीप जाण। तुंदुबिल्वग्रामनामाभिधान। ब्राह्मणवंशीं अवतारपूर्ण। तेथें घेतला श्रीव्यासें'. जयदेव व्रतबंधानंतर विनाभ्यासच सर्वशास्त्रीं निपुण झाला. भगवद्भक्ति करण्यासाठीं त्यानें गीतगोविंद ग्रंथ केला. पद्मपुराणांतील राधाविलास त्यांत वर्णिला आहे. गीतगोविंद अनेकांनीं लिहून घेतलें व घरोघर लोक तेंच गाऊं लागले.

पुष्पें असतीं एके स्थळीं। परि सुवास धांवे भूमंडळीं।
तैसाच ग्रंथ उर्वीस्थळीं। गीतगोविंद प्रकटला ॥

जगन्नाथक्षेत्रींचा राजा 'सात्त्विक' यानेंहि जयदेवस्वामींसारखाच एक ग्रंथ करून लोकांना तोच ह्मणण्याविषयीं आज्ञा केली. परंतु विद्वान लोक रागावले व राजास म्हणाले—

"सर्वज्ञ जे कां होती। ते स्वमुखें कीर्ति न वर्णिती। तूं सांगतोसि जनांप्रति। 'माझा ग्रंथ पाठ करा!'...उत्तम कविता, चातुर्यपण स्वमुखें वर्णितां मूर्खत्व ये."

मग दोनी ग्रंथ जगन्नाथासमोर ठेवून देवास कोणता मानवतो तें पहावयाचें ठरलें. त्याप्रमाणें रात्रीं देवासन्निध ते ठेवल्यावर गाभाऱ्यास कुलुप लावून टाकलें. दुसरे दिवशीं पहाटे पाहतात तों गीतगोविंद मात्र

देवाजवळ होतें व राजाचें काव्य गाभाऱ्याबाहेर पडलें होतें! सर्वांस आनंदीआनंद वाटला. राजा मात्र अति कष्टी झाला. देवास शरण जाऊन, ग्रंथाचा अव्हेर केल्याबद्दल त्यानें देवास काकुळतीनें जाब विचारला. देवानें ग्रंथ न स्वीकारल्यास राजानें प्राणत्यागाचाच निर्धार केला. तेव्हां नारायण प्रसन्न होऊन त्यानें राजाच्या काव्यांतील चोवीस श्लोक गीतगोविंदांत लिहिले. या तडजोडीनें राजाचें समाधान झालें!

जगन्नाथक्षेत्रांतील एका भगवद्भक्त अग्निहोत्री ब्राह्मणास एक कन्यारत्न झालें. तिचेंच नांव पद्मावती. उपवर झाल्यावर ही लावण्यगुणराशी कन्या ब्राह्मणानें जगन्नाथास त्याचेंच प्रसादफल म्हणून मनोभावानें अर्पण केली व तिला कोणी मागणी घातली तर 'कन्या कृष्णार्पण केली आहे' असें तो सांगे. पुढें जगन्नाथानें ब्राह्मणास स्वप्नांत दर्शन दिलें, व सांगितलें कीं, 'माझाच अवतार जयदेव आहे. त्यासच हें सालंकृत कन्यादान कर.' मग जयदेव व पद्मावती यांचा थाटानें विवाह झाला व ते जगन्नाथपुरींत राहिले.

जयदेवस्वामी नित्य हरिकीर्तन करीत व सच्छिष्य पाहून त्यास अनुग्रहहि देत. त्याप्रमाणें एका सच्छील व उदार सावकारास त्यांनीं अनुग्रह दिला. सावकारानें एकदा गुरूस आपले घरीं बोलवून षोडशोपचारें पूजा करून महिनाभर ठेवून घेतलें व उत्तम गुरुसेवा केली; आणि बोळवितेवळीं रथांत गुरुदान म्हणून पुष्कळ संपत्ति ठेवून त्यांतून जयदेवास परत पाठविलें. बरोबर दिलेल्या सेवकास तें द्रव्य पद्मावतीस देण्याविषयीं सावकारानें सांगितलें होतें. मार्गांत सेवकानें कांहीं जरूरीच्या कामानिमित्त घरीं परत जाण्याची परवानगी जयदेवाकडे मागितली व जयदेवानें त्यास जाऊं दिलें. इतक्यांत पाळत राखून दोन चोर तेथें आले. जयदेवानें 'सर्व घेऊन जा' म्हणून त्यांच्या ताब्यांत रथ दिला व आपण पुढें तसाच चालला. परंतु चोरांनीं त्यास पुनः गांठून त्याचे हातपाय तोडून त्यास एका कूपांत फेंकून दिलें व संपत्ति घेऊन ते पसार झाले. जयदेव तशाहि स्थितींत हरिभक्ति करीत आनंदांत होता. क्रौंच नामक राजा शिकारीस सहज तेथेंच आला. तेव्हां त्यास कूपांत तेजस्वी प्रकाश दिसला. पाहतो तों विष्णुभक्त ध्यानस्थ आहे. राजानें त्यास बाहेर

काढिलें व चौकशी केली. जयदेवानें आपण उपजतच इंद्रियातीत व करचरणविरहित आहों असें सांगितलें. राजानें जयदेवस्वामीस बरोबर नेलें व त्यांची त्यानें उत्तम बरदास्त ठेवली. स्वामींनीं राजास सेवाव्रत आचरावयास सांगितलें. त्याप्रमाणें राजानें येतील त्या साधुसंतांस इच्छा-भोजन व वस्त्रसुवर्णादि देण्याचा नेम केला. तेव्हां अनेक साधुसंत व याचकगण राजाकडे येऊं लागले. ते प्रथम साहाजिकच जयदेवस्वामीस भजत व नंतर राजा त्यांचा सत्कार करी. जयदेवाचे चोरहि साधुवेष घेऊन द्रव्यप्राप्तीसाठीं तेथें आले. परंतु जयदेवास पाहतांच ते भयभीत झाले. जयदेवानेंहि त्यांस जाणले. पण जयदेव म्हणजे क्षमेची मूर्ति अस-ल्यानें त्यानें साधुरूपी चोरांसच नमन केलें व त्यांचा उत्तम सत्कार करा-वयास सांगितलें. कपटी साधूंना पुष्कळ द्रव्य मिळालें व ते निघून गेले. त्यांस दूतांनीं विचारिलें कीं, ‘ जयदेवस्वामी आपल्याविषयीं इतका विशेष आदर कां दाखवितात ? ’ त्यांनीं खोटेपणानें उत्तर दिलें, “ जयदेवास पूर्वीं एका राजानें देहान्त शिक्षा दिली होती, ती बजावण्याचें कार्य आम्हांकडे होतें. आम्हांस दया येऊन आम्ही जयदेवाचे फक्त करचरण तेवढेच तोडले. व त्यास जीवदान दिलें. त्यामुळें तो आम्हांस मानतो ! ” तों काय चमत्कार झाला कीं, सर्वसहा अशा पृथ्वीलाहि हें असत्य खपलें नाहीं. तत्काळ भूमी तेथेंच दुभंग झाली व तींत ते कपटी साधु गाडले गेले ! दूतांनीं हें आश्चर्यवृत्त जयदेवस्वामीस कळविलें तेव्हां भगवंतांची प्रार्थना करून स्वामी “ म्हणे, हे कृष्णा पतितपावना । भक्तवत्सला रुक्मिणीहरणा । माझे शत्रूंसि जगज्जीवना । अधोगतीस कां नेलें ? ” तेव्हां देव प्रसन्न झाले व त्यांनीं तत्काळ पुष्पक धाडून वेषधारी साधूंना वैकुं-ठास नेलें. जयदेवासहि पुनः हस्तपाद फुटले. तेव्हां क्रौंच राजास साराच चमत्कार वाटला. जयदेवानें राजास सर्व पूर्ववृत्त कथन केलें. राजानें नंतर शिबिका पाठवून पद्मावतीस आणविलें व गुरुमातेप्रमाणें तिची पूजा केली. तसेंच राणीसहि पद्मावतीची सेवा करावयास त्यानें सांगितलें.

पुढें एकदा राजस्त्रिया बोलत बसल्या असतां, राणीचा बंधु मृत झाल्याची खातमी आली. तेव्हां त्याची बायको सती जाण्यास निघाली.

साऱ्या बायकांना नवल वाटलें व त्या स्तब्ध झाल्या, परंतु पद्मावती शांतपणें पहात होती. ती म्हणाली, “ अशा सती जाण्यानें पुनः पतिसमागम कसचा होणार ? भ्रताराचें ऐकोन मरण। आपण तत्काळ द्यावा प्राण। सूर्य मावळतां जैसे किरण। अस्त होती तयासवें. ” मग एकदा राणीनें प्रचीति पाहण्यासाठीं जयदेव राजाबरोबर मृगयेस गेला असतां प्रधानाकडून जयदेव मेल्याचें खोटेंच वृत्त आणविलें. तें ऐकतांच पद्मावतीनें खरोखरीच प्राण सोडला ! राजा नगरास परतल्यावर त्याला हें वृत्त कळतांच राणीच्या कृतीचा त्यास भयंकर संताप आला. व तिला मारण्याचेंहि त्यानें मनांत आणलें, परंतु स्त्रीहत्याभीतीनें त्यानें तो बेत सोडून दिला. व स्वतःच अग्निकाष्ठें भक्षण करण्याची सिद्धता केली. त्यानें जयदेवस्वामीस वंदन करून पद्मावतीच्या मृत्यूचें वृत्त त्यास कळविलें. जयदेवानें भार्येच्या प्रेताजवळ येऊन, टाळवीणा करीं घेऊन राधाविलास चोवीस प्रबंधांत गाइला. ईश्वरनामसंकीर्तनांत जयदेव तल्लीन होऊन हरिरंगणीं नाचूं लागला तेव्हां परमेश्वर प्रसन्न झाले व त्यांनीं जयदेवास प्रेमालिंगन दिलें, आणि वरहि दिला कीं,

‘ तुझ्या अष्टपद्या अखंड गाती। कीं आवडी करूनि ऐकती।
तयांसि मी लक्ष्मीपति। कर जोडोनि उभा असें ॥ ’

पद्मावतीसहि आलिंगन देऊन ईश्वरानें पुनरुज्जीवित केलें; त्यावेळीं चहूंकडे एकच जयजयकार होऊन देवांनींहि विमानांतून पुष्पवृष्टि केली.

महीपति नम्रपणें म्हणतो कीं, “ग्वाल्हेर देशींचा ‘ नाभाजी ’ नामक एक परमविष्णुभक्त असा ब्राह्मण होता—

भक्तचरित अति अद्‌भुत। त्याणें वर्णिलें यथार्थ।
त्याचीं पदें पाहून निश्चित। ग्रंथ महाराष्ट्र लिहिला ॥
सायखेडीयाचें बाहुलें। नाचवी त्या सूत्रें नाचलें।
जयदेव आख्यान बोलिले। माझिया मुखें तैसेंचि ॥ ”

चंद्रदत्तकृत संस्कृत ‘ भक्तमाला ’ ग्रंथांत ( अध्याय ३९ ते ४१ ) अशाच प्रकारच्या जयदेवाच्या आख्यायिका असून प्रत्यक्ष कृष्णांनीं जयदेवरूपानें येऊन जयदेवास समर्पक शब्दयोजना कांहीं स्थलीं सुचत

नव्हती, ती लिहिली अशा आशयाचीहि एक अख्यायिका त्यांत वर्णिली आहे. आणखीहि इतर चमत्कारांच्या कथा भक्तमालेंत आहेत. हे तिनी अध्याय निर्णयसागरी गीतगोविन्द काव्याच्या संपादकांनीं प्रस्तावनेंत दिले असून ते जिज्ञासूस उपयोगी पडतील. प्रस्तुत चमत्कारिक आख्यायिकांवर कोणाचा विश्वास न बसला, तरी तेवढ्यावरून जयदेव हा उत्तम रसिक कवि, परमभगवद्भक्त व उत्कृष्ट साधु होता हें कोणासहि अनुमान करतां येईल.

## २. गीतगोविंदांतील नायिकांचे प्रकार

नायिकांचें वर्णन गीतगोविंदावरील बहुतेक टीकांत कोठून कोठून उद्धृत केलें असून तें थोडक्यांत असें:—

**अभिसारिका**— प्रियकराकडे संकेतस्थलीं जाणारी स्त्री. (गीतगोविंद सर्ग ५)

‘ लज्जां हित्वा समाकृष्य यौवनेन मदेन वा ।
अभिसारयते कान्तं कीर्तिता साभिसारिका ॥ ’

**वासकसज्जा**— अलंकार घालून प्रियकराच्या स्वागतास सज्ज स्त्री. ( गीतगोविंद सर्ग ६ )

‘ दूतीमहरहः प्रेष्य सज्जिते वासवेश्मनि ।
यस्या न मिलति प्रेयान्सा हि वासकसज्जिका ॥’

‘ भवेद्वासकसज्जासौ सज्जिताङ्गरतालया ’

‘ स्ववासकवशात्कान्ते समेष्यति गृहं प्रति
सज्जीकरोति चात्मानं या सा वासकसज्जिका’

‘ वासवेश्मनि (सु) कल्पिततल्पे वा समागमविधिं विदधाना ।
पश्यति प्रियसमागमशय्यां पश्यति स्म प्रियवासकशय्याम् ॥’

**उत्का अगर उत्कण्ठिता**—( प्र. १३ गी. गो. )

‘ उत्का भवति सा यस्याः संकेतं नागतः प्रियः
तस्यानागमने हेतुं चिन्तयन्त्याकुला यथा ’

**स्वाधीनभर्तृका**–( प्र. २३ )

'यस्या रतिगुणाकृष्टः पतिः पार्श्वं न मुञ्चति
विचित्रविभ्रमैर्युक्ता स्वाधीनपतिका यथा'
'क्षणं कराहतेनैव क्षणं चरणपातिते
कन्दुकेनेव कान्तेन क्रीडेत्स्वाधीनभर्तृका'

**खण्डिता**—( प्र. १७ ) पतीचें अखंड प्रेम नसल्यानें रागावलेली स्त्री.

'उल्लंघ्य समयं यस्याः प्रेयानन्योपभोगवान्
भोगलक्ष्म्याङ्कितः प्रातरागच्छेत्सा हि खण्डिता'

निद्राकषायकलुषीकृतताम्रनेत्रो नारीनखव्रणविशेषविचित्रिताङ्गः।
यस्याः कुतोऽपि गृहमेति पतिः प्रभाते सा खण्डितेति कथिता कविभिःपुराणैः॥

**विप्रलब्धा**—(स.७) प्रियकरानें संकेत न पाळल्यानें फसविलेली नायिका.

**कलहान्तरिता**–( गी. गो. सर्ग ९ ) प्रियकरावर प्रणयकोपानें स्वतःच रागावून त्याला झिडकारणारी व तो गेल्यानंतर पश्चात्ताप करीत असलेली स्त्री.

'प्राणेश्वरं प्रणयकोपभरेण लभ्यं तं चाटुकारमचिरादवधार्य पश्चात्।
संतप्यते मदनवह्निशिखासहस्रैर्बाष्पाकुलानुकलहान्तरितेति सा स्यात्॥'
'प्राणेश्वरं प्रणयकोपभरेण भीतं या चाटुकारमवधीर्य विशेषवाग्भिः॥
संतप्यते मदनवह्निशिखासहस्रैर्बाष्पाकुला च कलहान्तरिता हि सा स्यात्॥'

# ३. गीतगोविंदांतील पाठांतरें

हीं पाठांतरें बरींच आहेत. त्यामुळें मूळ कवीच्या कृतीवर निष्कारण दोष येण्याचा संभव उत्पन्न झाला आहे. उदाहरणार्थ स. ७ श्लो. ९ याच्या दुसऱ्या ओळींत 'संदर्शितेन्दीवरम्' असा व 'संदर्शितेन्दिन्दिरम्' असाहि पाठ आहे. पैकीं दुसरा अधिक सयुक्तिक दिसतो सुश्लोकगोविंदांत पहिला स्वीकारला गेला आहे, कारण त्याच्या रचनाकालीं हा दुसरा पाठ मला आढळला नव्हता.

त्याचप्रमाणें गीतगोविंदांत क्षेपक भागहि असावा असा विद्वानांचा कयास आहे. विशेषतः सर्गसमाप्तीचे कांहीं श्लोक निरनिराळया कृतींत निरनिराळे आहेत. क्वचित् ते अजिबात नाहींत. सर्गांचीं नांवेंहि निर-

निराळ्या प्रतींत निरनिराळीं आहेत. इतकेंच नव्हे तर सर्व प्रबंधांस-देखील निरनिराळीं नांवें असल्याचें कुम्भनृपतीच्या टीकेवरून दिसतें. गीतगोविंदांत क्षेपक भाग थोडा तरी असावा या विधानास महीपतीनें भक्तिविजयांत वर्णन केलेल्या जयदेवाख्यानांत जें सांगितलें आहे कीं, सात्विक राजाच्या काव्यापैकीं २४ श्लोक प्रत्यक्ष जगन्नाथानेंच गीत-गोविंदांत घातले, त्या कथाभागानेंहि कांहींशी पुष्टि मिळते असें म्हणतां येईल. ( पहा पृ. ११२ )

## ४. गीतगोविंदांतील गुणापकर्षक स्थलें

गीतगोविन्दकार जयदेव ‘पाण्डितकवि’ ‘कविराज’ इत्यादि प्रकारें ख्यात असला तरी त्याच्या काव्यांत फार थोडे कां होईना, पण कांहीं स्थलीं मात्रादोष, यतिभंग इत्यादि आढळतात. कदाचित् ते अनव-धानानें आले असावेत. कदाचित् लेखकांच्या प्रमादानेंहि हीं स्थलें राहिलीं असावींत. तीं पुढीलप्रमाणें होतः—

सर्ग २ श्लो. १–हरिणीवृत्तांत असणारा दुसरा यति प्रथम चरणांत पाळला गेला नाहीं.‘विहरति वने राधा साधारणप्रणये हरौ’यांत यतिभंग आहे.

सर्ग १२ प्र.१३–क. ६ मध्यें ‘मम श्रुतियुगुले’ यांत ‘श्रु’मुळें होणारा मागील अक्षरावरचा आघात पाळलेला नाहीं.

सर्ग १२ श्लो. १५–‘यावच्छृङ्गारसारस्वतमिह जयदेवस्य विष्वग्वचांसि’ यांत ‘जयदे वस्य’ हा यतिभंग होय.

गीतगोविंदांत कांहीं ठिकाणीं क्लिष्टार्थत्वहि आहे. प्रसिद्ध उदाहरण–

पश्यति दिशि दिशि रहसि भवन्तम् ।
त्वदधरमधुरमधूनि पिबन्तम् ॥ स. ६ प्र. १२ क. १

हेंच उदाहरण कै. वासुदेवशास्त्री खरे यांचे चरित्रांतील आठवणींत उद्धृत केलें आहे. (खरे-चरित्र पृ.१३३). यांतील ‘त्वत्’चा अर्थ ‘अन्य’ गोपी असा कोणी कोणी करतात.

# ५. महत्त्वाचें शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | शुद्ध |
|---|---|---|
| (१) | १३ | जयदेवाचा |
| (६) | १० | अधरमधुरमधुरसरसिकं |
| (७) | ३० | —चूताङ्कुर– |
| (९) | ९ | विष्वग्वचांसि |
| (२२) | १९ | आध्यात्मिक |
| (२८) | १५ | —स्कन्धार्पित– |
| (३२) | ७ | understanding |
| (४०) | ५ | चित्रपद्धतीहि |
| ६ | १५ | कामी जनाप्रति |
| १७ | ११ | —मदना ! |
| २६ | ५ | मर्दुनीयां |
| २७ | ९ | हरीपाशिं |
| ३७ | ३ | तीच्या |
| ३८ | २ | शोधुनी |
| ८८ | १२ | गहनमपि |
| ९१ | शेवटचे चार श्लोकांक अनुक्रमें ७, ८, ९ व १० समजावेत. | |

**सूचना**—कांहीं चित्रांवर ' जयपूर चित्रपद्धति ' असें पडलें आहे तेथें ' कांग्रा चित्रपद्धति ' असें समजावें.

साहित्यस्नेहमंडळाचें तिसरें पुस्तक

# सुश्लोकगोविंद

**या ग्रंथास उत्कृष्टपणाबद्दल डेक्कन व्हर्‌न्यॉक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटीकडून पन्नास रुपये पारितोषिक मिळालें असून इतर अनेक विद्वानांचे उत्तम अभिप्राय आहेत.**

**रा. सा. ना. गो. चापेकर,** अध्यक्ष ( १९ वें ) महाराष्ट्र साहित्यसंमेलन, हे सुश्लोकगोविंदाचें परीक्षण करताना म्हणतात–

"डॉ. श्रीखंडे यांच्या काव्यांतील सरलता, सहजता, प्रसाद आणि अस्खलितपणा निःसंशय वाखाणण्यासारखीं आहेत. या बाबतींत **त्यांच्याशीं मनगट भिडवूं पाहणारे मराठी कवि या नवयुगांत फारच थोडे** सांपडतील, असें आम्हांस वाटतें. 'वाङ्मय–श्री–खण्डा'ची रुचि दुधांत पडलेल्या साखरेइतकी म्हणण्यापेक्षां दह्यांत पडलेल्या साखरेइतकी मधुर असेल तर सुश्लोकगोविंदाचा सुवास त्यांत टाकलेल्या केशराइतका गोड आहे. जयदेवाची कविताकन्या आपल्या मांडीवर दत्तक घेतांना दत्तक घरच्या छळाचा अपवाद टाळण्यासाठीं तिच्या पहिल्या घरच्या दागदागिन्यांना तर त्यांनीं हात लावलेला दिसतच नाहीं. उलट, आपल्या अल्प कुवतीप्रमाणें यथाशक्ति दोन पदरचेच लहानमोठे अलंकार त्यांनीं तिच्या अंगावर चढविले आहेत."–**सकाळ**

**नवशक्तिः**—"सुंदर भाषांतर ही एक स्वतंत्र कलाकृति होऊं शकते ही गोष्ट हें पुस्तक वाचीत असतां पटल्यावांचून रहात नाहीं."

**श्री. ग. श्री. हुपरीकर, एम्. ए.:**—"एकंदरींत संस्कृतांतील मुख्य भावास धक्का न लावतां वर सांगितलेलीं सर्व तंत्रें संभाळून आपलें भाषांतराचें कार्य त्यांनीं कुशलतेनें पार पाडलें आहे."–**विहंगम**

**प्रो. के. ना. वाटवे, एम्. ए. ( महाराष्ट्रसाहित्यपत्रिका व परशुरामियन् ):—**

"पद्यमय व संगीतानुकूल गीतगोविंदाचें भाषांतर श्लोकांतच व्हावें

हे उचित असलें तरी तें तितकें सोपें नाहीं. व लिहावयास संतोष वाटतो कीं, सदर पद्यमय अनुवाद एकंदरीनें पाहतां मूळ काव्याच्या कीर्तीला शोभेल असाच उतरला आहे....पुस्तकास जोडलेली प्रस्तावना फार परिश्रमपूर्वक लिहिली असून तींतिल माहिती जितकी पूर्ण (exhaustive) आहे तितकीच चिकित्सकपणें व सहृदयतेनें जुळविलेली आहे. त्यांनीं वामनमुक्तेश्वरादि जुन्या कसलेल्या मराठी कवींच्या काव्यांतील शब्दरचनेचा थाट येथें मांडला आहे. त्यामुळें स्वतंत्रपणें वाचलें तरी सुश्लोकगोविंद हें एक अस्सल मराठी काव्य आहे असें वाटतें."

**महाराष्ट्रः**–" दुसरेंहि एक धोरण अनुवाद करतांना त्यांनीं अंगिकारिलें आहे. तें असें कीं, इतर कित्येक भाषांतरकारांप्रमाणें शब्दाला शब्द ठेवण्याच्या पद्धतीचा अवलंब न करितां किंवा त्याप्रकारचें निर्जीव रटाळ शब्दांतर करण्यांत धन्यता न मानतां केवळ अर्थ आणि रस यांच्या अनुरोधानें त्यांनीं गीतगोविंदाचा अनुवाद केला आहे. त्यामुळें जयदेवाच्या कृतींतील स्वारस्य त्यांत उत्कृष्ट रीतीनें प्रतिबिंबित झालेलें असून, त्यांचा 'सुश्लोकगोविंद' वाचतांना थोरल्या शास्त्रिबोवांच्या मेघदूताप्रमाणें, आपण स्वतंत्र सुंदर काव्य वाचीत आहों, असा भास पुष्कळदां होतो...अनुवाद म्हणून हा ग्रंथ जितका संग्राह्य वाटतो तितकाच गीतगोविंदाची मराठी आवृत्ति म्हणूनहि तो संग्राह्य वाटण्यासारखा आहे. ...भाषांतरकार हा सहृदय असेल व त्याच्यांत मूळ कवीच्या कृतीविषयीं प्रेम आणि आदर असेल, तर अनुवादाचें काम किती सर्वांगसुंदर होऊं शकतें, याचा प्रस्तुत ग्रंथ हा उत्कृष्ट नमुना आहे; व मूळ जगन्मान्य काव्यकृतीला नांवें ठेवीत तिचें नुसतें शब्दांतर करण्यांत कृतकृत्यता मानणाऱ्या लब्धप्रतिष्ठ भाषांतरकारांना त्यापासून पुष्कळ बोध घेतां येईल."

**कविवर्य भा. रा. तांबेः**–"......इ. इ. कितीतरी प्रकारांनीं ग्रंथ संग्राह्य व मनोहर केला आहे. याशिवाय अत्यंत सुंदर हिंदुस्थानी पद्धतीचीं चित्रेंहि घातलीं आहेत. इतके परिश्रम करून जर सारेच ग्रंथकार आपआपलीं पुस्तकें प्रकाशित करतील तर मराठीचें महद्भाग्य म्हणावयाचें. आपली कृति जनतेपुढें ठेवितांना ती सर्वांगरमणीय करण्यांत

अणुमात्र कुचराई किंवा कसूर करावयाची नाहीं ही आपली रीत केवळ आदरणीयच नव्हे तर इतर ग्रंथकारांनीं कित्ता घेण्यासारखी आहे.

आपण लिहिलेली प्रस्तावना उद्बोधक, मननीय आणि विद्वत्त्वपूर्ण आहे. विद्वत्त्व आणि कवित्व यांचा नित्यसंबंध असावयास पाहिजे असा आग्रह धरण्यांत हंशील नाहीं. पण प्रतिभा लाभली असल्यावर तीस विद्वत्त्वाची जोड मिळाल्यास दुधांत साखर घातल्यासारखें होईल यांतहि संदेह नाहीं. आपली सारी कृति अशीच मधुर आहे. पद्यरचना काव्य-रम्य तशीच विद्वत्त्वरम्य अशी आहे. कोठें छंदोभंग, कीं यतिभंग, कीं शब्दाची ओढाताण झालेली माझ्या ध्यानीं आलेली नाहीं. कवित्वाचा उष्मा आणि विद्वत्त्वाचा शीतलपणा हें अंतःकरणाचे दोनी वरदहस्त सर्वत्र सहकार्य करीत असलेले दिसतात. आणि हेंच योग्य आहे. ... ......आपली कृति खरोखरीच वाखाणण्यासारखी आहे. भाषा मधुर, प्रसादपूर्ण, रसानुकूल अशी आहे. आपलें रूपांतर मीं मुळाशीं ताडून पाहिलें; कोठेंहि रसापकर्ष झालेला नाहीं. मुळाप्रमाणें रूपांतर रसपूर्ण आहे. संस्कृत साहित्यमंदिरांत किती तरी सुंदरी अद्यापि मराठी वेष धारण करावयाची वाट पहात आहेत. त्यांस योग्य हा पोशाख आपण घालाल का ? या कामीं प्रस्तुत रूपांतरानें आपण आपला अधिकार सिद्ध करून दाखविला आहे. ...."

**एक विद्वान् रसिक परीक्षकः**—"...जयदेवाची ' मधुर कोमल-कान्तपदावली 'च प्राकृत अवतारांत मराठी वाङ्मयांत आली आहे असें कोठें कोठें सहज म्हणतां येईल...प्रस्तावना वाचल्यानें वाङ्मयभक्तांस पुष्कळ उपयुक्त व मनोरंजक माहिती मिळेल. तींत जयदेवाच्या काव्याचें चांगलें व तुलनात्मक असें विवेचन आहे व पाश्चिमात्य संशोधक पंडितांचींहि मतें उद्धृत केलीं आहेत. यामुळें प्रस्तावना वाचनीय व उद्बोधक झाली आहे. पुस्तकाच्या अंतरंगाप्रमाणें बाह्यांगही सुंदर आहे. पुस्तक सर्व प्रौढ सुशिक्षितांनीं वाचण्यालायक आहे. शृंगाररसानें काव्य ओथंबलेलें असलें तरी अश्लीलता आढळत नाहीं. भाषा सरळ, सुबोध व मनास आनंद देणारी आहे......अलिकडे दररोज भरडून निघणाऱ्या पुष्कळशा रसहीन आधुनिक काव्यांचा विचार मनांत आणला

म्हणजे प्रस्तुत कवीस कांहीं अंशीं आधुनिक वामन म्हणावेंसें वाटतें ह्या काव्याची सरस व टिकाऊ काव्यांत गणना करतां येईल म्हणून त्यानें महाराष्ट्र वाङ्मयांत चांगली भर घातली असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं."

श्री. ज. र. आजगांवकर 'महाराष्ट्रकविचरित्रा'चे कर्ते-(पत्र)

"....श्रीकृष्ण आणि राधा ह्यांच्या शृंगाराचें वर्णन चालू युगांत करणें म्हणजे स्वतःच्या जीर्णमतवादीपणाचें प्रदर्शन करणें होय. असें मानण्याची आजची प्रथा आहे. म्हणून आपल्या नीतिधैर्याबद्दल मी आपलें अभिनंदन करतों. आपण लिहिलेली प्रस्तावना फार शोधकपणानें लिहिली असून, ती वाचून मला पुष्कळच नवीन माहिती मिळाली. आपली विद्वत्ता व सहृदयता यांचा ठसा या प्रस्तावनेंत स्पष्ट उमटला आहे. हिऱ्याला जसें सुवर्णाचें कोंदण तशी गीतगोविंद काव्याला ही प्रस्तावना फार शोभून दिसते...आपली पद्यरचना पाहून वामनाच्या 'रासक्रीडा' काव्याची......मला आठवण झाली. संस्कृत भाषेचें वैभव येवढें मोठें आहे कीं, त्या भाषेंतल्या कोणत्याहि काव्याचें भाषांतर करतांना, भाषांतराच्या गाळण्यांतून सगळा रस जशाचा तसा, खालीं पडणें शक्य नाहीं. असें असूनहि आपलें भाषांतर एकंदरींत फार सुदर उतरलें आहे हें लिहिण्यास मला आनंद वाटतो. मृदु शब्दयोजना आणि ध्वनिमाधुर्य वाखाणण्यासारखें आहे. आपण नानाप्रकारचीं वृत्तें वापरण्यांत खरोखर मोठें कौशल्य दाखविलें आहे. असो. एकदरींत आपलें भाषांतर उत्कृष्ट उतरलें आहे. आणि त्याच्या योगानें मराठी वाङ्मयांत एका सुंदर ग्रंथाची भर पडली आहे यांत संशय नाहीं. हल्लींचा गाजरपारखी महाराष्ट्र आपल्या परिश्रमाचें कसें काय चीज करतो पाहूं."

श्री. श्री. कृ. सोवनी, बी. ए., एल्एल्. बी. (कवि-कृष्णकुमार)-

"I relished the book very much and have read and reread it several times; still it gives me fresh pleasure every time and I feel that I am seeing something new everytime. That is according to me the true criterion of *beauty*. "प्रतिक्षणं यन्नवतां विधत्ते तदेव रूपं रमणीयतायाः।" I am unable to express in words the excellence of your book."

**कवि वि. ना. मुंगळे** ' संस्कृत वसंतवनवर्णनप्रबन्ध ' कर्ते व वे. शा. सं. **अप्पाशास्त्री सांगावकर** हे ' वाङ्मय-श्री-खण्ड व ' सुश्लोकगोविंद ' या दोहींविषयीं मत देतातः—

" मोदावहं शीलनसक्तचेतसां सद्भिस्स्तुतं निर्भरसद्गुणान्वितं ।
व्रजाङ्गनाप्रेमनिबन्धमुत्तमं सुश्लोकगोविन्दमिति स्मरेन्न कः ॥
एतत्सदामोदविधायि शीलनात्प्रसादमुख्यैश्च मनोहरैर्गुणैः ।
चेतःसमाकर्षि-विसारि-वाङ्मय-श्री खण्ड-मेतं रसिको न को वदेत् ॥

एकंदरीनें विचार केला असतां ' द्विजराजाचें उपचीयमानश्रि असें हें कलाकृतिद्वय ' अत्यंत रमणीय व अवलोकनीय असून तें महाराष्ट्र भाषेंतील उत्तम काव्यमालिकेंत गुंफण्यास पात्र आहे. "

**केसरी**—" वरवर दिसणारा शृंगारासारखा विषय रंगविणारा जयदेवासारखा अत्यंत रसिक व मार्मिक कवि यामुळें सारें काव्य नितांत रमणीय झालें असल्यास काय नवल ? रा. श्रीखंडे यांनीं जयदेवाच्या या सुविदित संस्कृत काव्याला महाराष्ट्र भाषेचा वेष चढविला आहे. सुश्लोकगोविंदांत अनुवादकानें मूळ काव्याची गोडी शक्य तितकी आणण्याचा कसोशीचा प्रयत्न केला आहे. ' गीतगोविंद ' हें संस्कृत काव्य न वाचतां, त्याचा हा अनुवाद वाचला तरी रसिकाचें बरेच समाधान होईल इतका तो चांगला वठला आहे. "

**प्रो. मा. त्र्यं. पटवर्धन, एम्. ए., १९ वें साहित्य संमेलनांतील काव्यविभागाध्यक्षीय भाषणः**—

" भाषांतराचें महत्त्व थोडें नाहीं. अलिकडील भाषांतरांत श्रीखंडेकृत सुश्लोकगोविंन्द हें गीतगोविन्दाचें भाषांतर सरस वाचनीय आहे. "

**श्रीमन्त बाळासाहेब पंतप्रतिनिधि, बी. ए., अधिपति सं. औंध**—

"...आपल्या कृतीला ' सुश्लोकगोविंद ' हें नांव देताना डॉ. श्रीखंडे यांनीं ' सुश्लोक वामनाचा ' ही प्रसिद्ध आर्या तर आपल्यापुढें ठेविलेली नाहीं, अशी आम्हांस शंका येते. कारण डॉ. श्रीखंडे यांचे श्लोक खरोखरच ' सु '—म्हणजे अत्यंत चांगले असून त्यांची तुलना घडोघडीं पंडितांच्या सुश्लोकांशीं करण्याची इच्छा झाल्यावांचून राहवत नाहीं. उदाहरणार्थ,

'जिचे काळे डोळे बघुनि मृगबाळेंहि झुरतीं' या शब्दपंक्तींतील सरलता, वर्णानुकूलता आणि नादमाधुर्य, 'सुगंधीं काश्मीरें कवळुनि अशीं श्रीस्तनतटें' या पहिल्या सर्गातील किंवा 'निळ्या वक्षोभागीं धवल वनमाला विलसली' या अकराव्या सर्गातील पदपंक्तींत कांहींसुद्धां नाहीं म्हणणें खास धाष्टर्याचें होईल. डॉ. श्रीखंडे यांची सर्व पुस्तकाची रचनाच इतकी सहज, सुबोध, सार्थ, सालंकृत आणि ओघवती आहे कीं, त्यांतून उदाहरण म्हणून अमुक एक श्लोक काढणें अवघड आहे. गीतगोविंदाचें सुश्लोकगोविंद बनवितांना डॉ. श्रीखंडे यांनीं भाषांतराची वृत्ति ठेविली नाहीं हें फार चांगलें झालें, त्यामुळें त्यांची कुचंबणा तर झाली नाहींच, पण उलट जरूर तेथें अनुकूल असे कमीजास्ती फेरफार करून आपली स्वतंत्र प्रतिभा दाखविण्यास त्यांना अवसर मिळाला. डॉ. श्रीखंडे यांनीं मूळची सांखळी शक्यतोंवर सुटूं दिलेली नाहीं, पण जरूर तेथें फेरफार करण्यासहि माघार घेतलेली नाहीं. मुळांतले शब्दालंकार आणि अर्थालंकार शक्यतोंवर त्याच स्थळीं कौशल्यानें साधण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. पण विशदीकरणासाठीं प्रसंगीं एकाचे जागीं अधिक श्लोक घालूनहि रसहानि होऊं दिलेली नाहीं. कित्येक प्रसंगीं मुळांत नसलेल्याहि स्वतंत्र मनोहर कल्पना घालून फारच मौज केली आहे. मूळ गीतगोविंद, त्याचें रूपांतर सुश्लोकगोविंद व गीतगोविंदावर प्रकाश पाडणारी विस्तृत प्रस्तावनाहि देऊन पुस्तकाचे अंतरंग व बहिरंग डॉ. श्रीखंडे यांनीं फारच उत्कृष्ट रीतीनें सजविलें आहे, याबद्दल फारसें दुमत होणार नाहीं. मराठी भाषासुंदरीच्या भांडारांत सुश्लोकगोविंदानें एक चांगल्याच अलंकाराची भर घातली आहे. एवढें सांगितलें म्हणजे सुश्लोकगोविंदाची यथार्थ कल्पना होईल. गोविंदाचें सुश्लोकत्व सुश्लोकांत वर्णन केल्यामुळें कीर्तीचा 'कुमारसंभव' डॉ. श्रीखंडे यांना लवकरच प्राप्त होईल असा दृढ भरंवसा आहे." **–पुरुषार्थ**

**श्री. वि. स. खांडेकर**–लिहितात–"...काव्यरस आणि औषधा अगर नाडीचे ठोके आणि वृत्तबद्ध शब्द यांच्यांत तसें पाहिलें तर साम्यापेक्षां वैषम्यच अधिक सांपडेल. पण श्रीखंडे हे ह्या नियम सिद्ध करणाऱ्य

थोडयाशा अपवादभूत डॉक्टरांपैकीं आहेत यांत शंका नाहीं. हे पुस्तक वरवर चाळणारालासुद्धां डॉक्टरांच्या अभ्यासू वृत्तीचें व परिश्रमाचें कौतुक वाटेल. विस्तृत व सर्वस्पर्शी प्रस्तावना, काग्रा व्हॅली पद्धतीचीं सुंदर तिरंगी चित्रें, मूळ संस्कृत गीतगोविंद, सूचि, परिशिष्ट इत्यादिकांनीं मंडित झालेलें त्यांचे हें रूपातर म्हणजे सुसज्ज अशा सूतिकागृहात जन्माला आलेलें अपत्यच म्हणायचें......डॉक्टरांचें रूपांतर थोडेसें सैल असलें तरी सुंदर झालें आहे हें कुणीहि कबूल करील. उदाहरणार्थ, खालील श्लोक पहावे—

स्मरे मला आनन सुंदरीचें, रोषें वरी भ्रूकुटि वक्र नाचे,
भासे जणों अंबुज लालरंगीं, ज्याचेवरी चंचल नीलभृंगी.

भुलविति तरुणांना केश जे सुंदरींचे रतिमदनमृगाचें होत तें रान साचें !
कुरबकसुम तीच्या कुंतलीं कृष्ण घाली, दिसत घनसमूहीं जेविं विद्युत् निघाली!
काश्मीरगौर तनु लेवुनि रत्नकाची रेघेसमान दिसते अभिसारिकांची;
अंधार हाचि निकषोपल भासला गे ! त्याचें जणों प्रणयहेम कसास लागे !

'भृवः' 'लीलेंचि'...इत्यादि स्थळीं सफाईचा हात फिरला असता तर बरें झालें असतें. पण प्रातःकालीं पूर्वेकडे क्वचित् काळसर ढग दिसला म्हणून अरुणोदयाच्या शोभेंत उणेपणा येतो असें थोडेंच आहे... काव्य मोराच्या पिसाऱ्यासारखें असतें. दोन्हीहि फुलल्यावर त्यांच्या हेतूचें संशोधन न करतां त्यांच्या सौंदर्याचा आस्वाद घेणें हेंच रसिकांस आवडतें. त्या दृष्टीनें डॉ. श्रीखंडे याना 'गीतगोविंदा'चा पुनर्जन्म घडवून आणण्यांत चांगलेंच यश मिळालें आहे. बारा सर्गांतील ३१६ श्लोक याची साक्ष देतील. त्यांच्या अंगीं वसत असलेल्या रसिकतेचा व रचनाकौशल्याचा उपयोग मराठी काव्यवाङ्मयाला वाढत्या प्रमाणावर होवो अशीच सुश्लोकगोविंदाचे वाचक इच्छा करतील." —**प्रतिभा**

**श्री दत्तात्रय केशव केळकर, बी. ए., 'काव्यालोचन'कर्ते—**
(पत्र, ता. २९-५-३४)

"...आपलें 'सुश्लोकगोविंद' व त्याची विद्वत्तापूर्ण प्रस्तावना हीं दोन्हीं मीं मोठया आनंदानें वाचलीं. जयदेवाच्या भाषेंतील मुख्य गुण

जो नादमाधुर्य तो आपल्या सुश्लोकगोविंदांत चांगला उतरला आहे. प्रसादगुणाच्या बाबतींत तर आपलें भाषांतर मूळापेक्षांहि सरस आहे असें म्हणावेंसें वाटतें. संस्कृताशीं गाढ परिचय असणारांचें मत याहून कदाचित् विरुद्ध पडेल हें मी जाणतों. पण जयदेव, जगन्नाथ वगैरे उत्तरकालीन कवींनी प्रसादगुणापेक्षां नादमाधुर्याला फाजील महत्त्व दिलें आहे असें मला वाटतें. संस्कृतांतील दीर्घ समासांचें अनुकरण न करण्यांतहि आपण रसिकता प्रकट केली आहे. एकंदरीनें 'सुश्लोक-गोविंदा'नें मराठींत एक चांगल्या काव्याची भर टाकली आहे...."

**सरदार श्रीमंत माधवराव किबे, एम्. ए.,** (पत्र, ता. ७-७-३४)–

"हें पुस्तक सर्वच दृष्टींनीं संग्राह्य व आनंदवर्धक आहे. आधीं मूळ काव्यच कर्णमधुर, मनोहर पदलालित्यानें आकर्षक असून रसराजाच्या योगानें परिपूर्ण आहे. आपलें भाषांतरहि मुळास धरूनच आहे. मूळांत ज्याप्रमाणें रागदारीनें युक्त अशीं पदें आहेत त्याप्रमाणें रचना करण्यास कोणा विद्वान् गायकासहि आपल्या पुस्तकाचा अत्यंत उपयोग होईल. सरतेशेवटीं असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, इतकें नितांतसुंदर व चेतोहारी पुस्तक मराठींत दुसरें नाहीं. मराठी भाषेची याप्रमाणेंच तिला संस्कृतांतून संपन्न करून तिची वृद्धि करणारी सेवा आपले हातून घडो अशी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे."

---

# २ वाङ्मय-श्री-खण्ड

संपादकः—डॉ. रा. चिं. श्रीखंडे, एम्. बी., बी. एस्.

**प्रो. पां. वा. काणे,** एम्.ए., एलएल्.एम्. म्हणतातः—" या श्रीखंडाचा पाक फार चांगला उतरला आहे...अशा प्रकारचीं पुस्तकें फारच थोडीं आहेत. आपण वाङ्मयांत एक चांगली भर घातली आहे."

**'नवा काळ'** कर्ते लिहितातः—" वाङ्मय-श्री-खण्डांतील एकंदर गद्य काय अथवा पद्य काय, प्रौढ, प्रगल्भ, रसान्वित, आणि विनोद व उपदेश यांनीं युक्त असून ते आबाल स्त्रीपुरुषांना केव्हांहि वाचण्याला, एकांतांत असो वा सर्वांनीं मिळून असो, योग्य असें आहे."

**श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधि,** बी.ए. अधिपति संस्थान औंध हे वाङ्मय-श्री-खण्डातील संस्कृत काव्यासंबंधीं उद्गार काढतातः—" मनगटांत मगदुरी असलेल्याचीं हीं कामें आहेत. हें येरागबाळाचें खास काम नव्हे. समुद्राच्या आसपास दहा पांच मैलांच्या टापूंत फिरणाऱ्या एकाद्या अनोळखी प्रवाशाला समुद्राचा निश्चित ठावठिकाणा माहित नसला तरी त्याची गंभीर गर्जना मात्र त्याच्या कर्णपथावर सारखी आदळत असते, त्याचप्रमाणें श्रीखंडेबंधूंच्या या संस्कृत कविता वाचीत असतां कविसम्राट् कालिदास, भवभूति व भर्तृहरि यांच्या काव्याचा वाचकाना सारखा भास होतो. व त्यावरून लेखकांचा जबरदस्त व्यासंग व भाषेवरील त्यांची करडी हुकमत निदर्शनास येते."

डेमी ३०० पृ. हून अधिक

उत्तम बांधणी—किं. २ रु.

---

**मिळणेचीं ठिकाणें:** १ चिटणीस साहित्यस्नेहमंडळ, कोल्हापूर.

२ परचुरे, पुराणिक आणि मंडळी, माधवबाग, मुंबई.

व इतर प्रसिद्ध पुस्तकविक्रेते.

---

"श्रीज्ञानेश्वर" प्रेस कोल्हापूर.

# वाङ्मय-श्री-खण्ड

संपादक व प्रकाशक- **रामचंद्र चिंतामण श्रीखंडे**, एम्. बी. बी. एस्.
गुजरी, कोल्हापूर.

**प्रो. अ. बा. गजेन्द्रगडकर एम्. ए. यांची मार्मिक प्रस्तावना**

**डेमी साईझ पृष्ठसंख्या ३०० वर, उत्तम कापडी बायंडिंग, किं. २ रुपये**

[ प्रस्तुत ग्रंथास डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटी पुणें, यांजकडून उत्कृष्टपणाबद्दल पसतीस रु. पारितोषिक मिळालें असून, बडोदें संस्थानानें हा ग्रंथ शाळा व लायब्ररींसाठीं आपल्या राज्यांत मंजुर केला आहे. अनेक प्रसिद्ध वृत्तपत्रें व विद्वान यांनीं वाङ्मय-श्री-खण्डाची मुक्तकंठानें प्रशंसा केली आहे, त्यांतील फक्त थोडेच अभिप्राय पुढें दिले आहेत. ]

## वाङ्मय-श्री-खण्ड या ग्रंथाबद्दल कांहीं

# निवडक अभिप्राय

रा. सा. ना. गो. चापेकर, बी. ए. एल्एल्. बी. 'महाराष्ट्र साहित्यपत्रिके' त ( वर्ष ५ अंक २-३ ) ह्मणतातः—

यदि रामा यदि च रमा यदि तनयो विनयधीगुणोपेतः ।
तनये तनयोत्पत्तिः सुरवरनगरे किमाधिक्यम् ॥

आमच्या इकडे इंग्रजी शिक्षण सुरू होऊन जवळ जवळ १०० वर्षें झालीं. ह्या शिक्षणाचे परिणाम जर मापावयाचे असतील तर त्या कामीं श्री. श्रीखंडे ह्यांच्या वाङ्मय-श्री-खंडासारखे ग्रंथच उपयोगी पडतील. शिक्षणाचें अपेक्षित कार्य कोणतें असें कोणी विचारल्यास त्यास ह्या कोल्हापूरच्या श्रीखंडे कुटुंबाकडे बोट दाखविता येईल. सर्व बहीण-भावंडें सुविद्य, विनयशील, उद्योगी, बुद्धिमान् असल्यावर उद्धृत केलेल्या श्लोकांत कवीनें ह्मटल्याप्रमाणें असल्या कुटुंबापुढें स्वर्गसुद्धां तुच्छ वाटेल.

प्रस्तुत ग्रंथात कै. डॉ. शंकरराव श्रीखंडे व त्यांच्या विद्यमान बंधुभगिनी आणि आप्त ह्यांच्या लेखांचा व संस्कृत मराठी कवितांचा संग्रह केला आहे. हें सर्व लिखाण प्रसिद्धीकरितां ह्मणून जन्मास आलेलें नाहीं, ही गोष्ट विचारांत घेतली ह्मणजे त्याची किंमत किती आहे ह्याची

कल्पना करितां येईल. ह्या सर्व लेखांत विनोद, सभ्यता, बहुश्रुतता, मार्मिकता इत्यादि गुण प्रत्ययास येतात. अशीं कुटुंबें आपल्या समाजांत किती असतील ह्याचा प्रत्येकानें आपल्या मनाशीं विचार करावा. सारा वाचुनि ग्रंथ वाटत मना श्रीखंड होणें बरें !

डॉ. रामचन्द्र चिंतामण श्रीखंडे ह्यांनीं हा ग्रंथ प्रसिद्ध करून महाराष्ट्रापुढें एक अनुकरणीय कित्ता ठेविला आहे प्रस्तुत पुस्तकानें सरस्वतीमंदिराचें एक नवीनच दालन खोलल्यासारखें झालें आहे. अशा प्रकारची कौटुंबिक ग्रंथ-निष्पत्ति पहिलीच आहे असें वाटतें. डॉ. शंकरराव ह्यांची स्वप्नसभेची हकीकत त्यांचा विनोद व मार्मिकता सिद्ध करते. ह्यांतील पुर्वच कवींचीं काव्यें उच्च दर्जाचीं आहेत. तुलना करणेंच अशक्य. " तोलावया ठाव मिळे न माला ! "

असो. हें पुस्तक वाचीत असता काळ फार आनंदाचा गेला. ह्याबद्दल मी संपादक डॉ. रामभाऊ श्रीखंडे ह्याचा फार आभारी आहें.

—ना. गो. चापेकर

कविवर्य श्रीयुत भास्कर रामचद्र तांबे, ग्वाल्हेर, हे पत्रांत लिहितातः—

......... आपलें सुंदर पुस्तक वाङ्मय-श्री-खण्डही मिळालें. तें मीं बहुतेक वाचिलेंही आपलें कुटुंब ह्मणजे साहित्याचें गोकुळच ह्मणावयाचें ! भाऊबहिणी सारेच कविकवयित्री व सारेच साहित्यभक्त ! त्यांतही साहित्य व शास्त्र या दोहोंचाही तेथें अपूर्व संगम झालेला, हें पाहून फार आदर व कौतुक वाटलें.

गद्य पद्य दोनी गोड आहेत. भाषा स्वाभाविक, सरळ, प्रसादयुक्त, प्रवाहित अशी वाटली. संस्कृत पद्यरचनाही कोठेंही ओढून ताणून लिहिलेली नाहीं. वर्णनपद्धति परिणामकारक आहे. ......

ता. १०-१२-१२ —भा. रा. तांबे

सरदार श्रीमंत माधवराव किबेसाहेब, एम्. ए. सरस्वतीनिकेतन, इंदूर, हे ता. २९-१०-१२ च्या पत्रांत लिहितातः—

" आपण प्रसिद्ध केलेल्या वाङ्मय-श्री-खण्ड अशा श्लेषात्मक मथळ्याची एक प्रत अम्हां उभयतांस पाठविली, त्याबद्दल मी आपला

अत्यंत आभारी आहें. हें पुस्तक प्रसिद्ध करतांना जरी आपला हेतु कौटुंबिक स्वरूपाचा होता तरी यात प्रसिद्ध झालेलें वाङ्मय अनेक दृष्टींनीं उपयुक्त व जनमनमनोरंजक होईल यांत शंका नाहीं. हें पुस्तक वाचून प्रथम विचार मनांत येतो तो हा कीं, प्राचीन परंपरेच्या व वळणाच्या कुटुंबाची अभिवृद्धि व विकास किती मनोहारी होतो. आपल्या कै. बंधूंनीं अलेक्झांड्रियाहून लिहिलेलीं पत्रें विचारप्रवर्तक आहेत. त्यांच्या लेखांत उच्च प्रतीचा सहज विनोद असून त्यात समाजोन्नतीविषयीं कळकळही दृष्टीस पडते. शिवाय गद्य व पद्य या दोनी विभागांत काव्यही आहे. उदाहरणार्थ 'समुद्राचे कांठावर' हें गद्य व पद्यविभागांत 'रुक्मिणीपत्रिका', 'श्रीभवानीकमलेश्वराची आरती', 'मशयमणिमाला' इत्यादि मराठी पद्यें व 'शंकरसद्म', 'श्रीतुलसीस्तोत्र' इत्यादि संस्कृत पद्यें पहावींत.

आपलीं स्वतःचीं व आपल्या आप्तांचीं जीं पद्यें आपण जोडलीं आहेत तींही काव्यपूर्ण आहेत. उदाहरणार्थ, श्री. सौ कृष्णाबाई श्रीखंडे यांचें 'सावित्रीगीत', श्री. सौ गंगाबाई श्रीखंडे यांचा 'बागुलबोवा', आपलें 'श्रीकृष्णगीत', 'मुकुंदपूजा' इत्यादि मराठी पद्यें व आपल्या बंधूस लिहिलेलीं कवितात्मक संस्कृत पत्रें, स्फुट श्लोक व विष्णुसहस्रनामावरील मराठी लेख आणि शेवटीं श्री. कात्रेशास्त्री यांचें वर्षासमयवर्णन. हें तर जुन्या संस्कृत कवींची आठवण करून देतें.

अशा आपल्या या सुंदर पुस्तकांत माझा कांहीं वेळ आनंदांत निघून गेला याबद्दल मी आपले आभार मानतों. व आपल्या पुस्तकाची योग्य प्रसिद्धि व्हावी असें इच्छितों. — मा. वि. किबे

श्री. दत्तात्रय केशव केळकर बी. ए. 'काव्यालोचन' कर्ते ता. २६।९।३२ च्या पत्रांत लिहितातः—

........ The book ( वाङ्मय-श्री-खण्ड ) appears to be a unique family gathering in the realm of letters. ......

— दी. के. केळकर

'ज्ञानप्रकाश'कार लिहितातः—

या पुस्तकाचा योजना व घटना खरोखरच अपूर्व आहे कुटुंबां-तील माणसें एक गटानें एकत्र पहावयास सापडावीं म्हणून सर्व माणसांचा

जसा ग्रूपफोटो घ्यावा त्याप्रमाणें या पुस्तकांत श्रीखण्डे नामक कुटुंबां-तील सात जणांच्या वाङ्मयकृति संगृहीत केल्या आहेत आणि कौतुकाची गोष्ट ही कीं, त्या खरोखरच संग्रहयोग्य आहेत. कै. डॉ. शंकरराव श्रीखंडे, यांचे बंधु प्रस्तुत पुस्तकाचे संपादक व प्रकाशक डॉ. रा. चिं. श्रीखंडे, त्यांच्या तीन भगिनी, एक पुतणी व एक मावसबंधु अशा सात लेखक-लेखिकांची वाङ्मयनिर्मिति यांत समाविष्ट करण्यांत आली आहे. पुस्तकास वाङ्मय-श्री-खण्ड असें नांव देण्यांतील औचित्य यावरून लक्ष्यांत यण्यासारखें आहे. यांतील सर्वच लेख प्रसिद्धीच्या अपेक्षेनें अर्थातच लिहिण्यांत आले नव्हते. तरी लेखांची समर्पकता व त्यांतील वाङ्मय-पोषक गुण हे जणूं काय, लेख प्रसिद्धीच्या हेतूनेंच लिहिले असावेत अशा ठाकठिकीनें उतरलेले दिसतात. यांतील गद्य विभाग ११५ पृष्ठांचा असून त्यांतील सर्व लेख डॉ. शंकरराव यांनीं लिहिले आहेत. त्यांतील काल्पनिक सभांतील व्याख्यानांचा सतरा पत्रांचा संग्रह कोणासही विचार-प्रवर्तक होणारा आहे. ही पत्रें त्यांनीं संसारदेहलीवर पदन्यास करणाऱ्या आपल्या भगिनी सौ. कृष्णाबाई यांना लिहिलीं आहेत. 'माझा एक अनुभव', 'कंपाउंडरची कहाणी', व 'समुद्राचे कांठावर' हे लेख वाचनीय, बोधक व मनोरंजक आहेत. या सर्वच लेखांतील विनोद व कल्पना-रम्यत्व प्रशंसनीय आहे. दुसऱ्या म्हणजे पद्यविभागांत एकंदर ५३ कविता असून त्यांपैकीं डॉ. शंकरराव यांच्या १२, सौ. कृष्णाबाई यांच्या ३, सौ. वेणूबाई यांची १, सौ. गंगाबाई यांच्या ५, कु. कृष्णाबाई यांच्या ३, व डॉ. रा. चिं. श्रीखंडे यांच्या २० कविता आहेत. प्रकाशकांचे मावसभाऊ रा. विश्वनाथशास्त्री कात्रे यांच्याही यांत ९ कविता आहेत. शेवटच्या ३५ पानांत डॉ. शंकरराव यांच्या ४, डॉ. रामभाऊ यांच्या १३, रा. विश्वनाथशास्त्री यांच्या २ अशा संस्कृत कविता देण्यांत आल्या आहेत. डॉ. श्रीखंडेबंधु यांना संस्कृतमध्येंही पत्रव्यवहार चालत असल्याचें या संग्रहावरून दृष्टोत्पत्तीस येतें. ही स्थिति लेखकांना जशी भूषणावह आहे तशीच ती वाचकांनाही कौतुकावह वाटल्यावांचून राह-णार नाहीं. पुस्तकांतील कोणताही भाग वाचला तरी लेखक-लेखिकां-मधील उच्च प्रकारच्या वाङ्मयाची निर्मिति करण्याचा अंगस्वभाव

दृग्गोचर होतो. एका कुटुंबांतल्या माणसांच्या तोंडवळ्यांत ज्याप्रमाणें सामान्यतः सारखेपणा दिसून येतो त्याप्रमाणेंच वाङ्मयाभिरुचि हा साधारण गुण, प्रस्तुत पुस्तकावरून, श्रीखंडेकुटुंबांत दृष्टोत्पत्तीस येतो. प्रो. अ. बा. गजेंद्रगडकर यांनीं प्रस्तावनेंत पुस्तकासंबंधानें दर्शविलेल्या गौरवपर मतांशीं कोणाही रसिक वाचकांचा मतभेद होईल असें आम्हास वाटत नाहीं. 'प्रकाशकाचें हृद्गत' या सुमारें पन्नास पानांतील मजकूर पुस्तकांतील अंतरंगावर चांगल्या रीतीनें प्रकाश पाडणारा आहे.

—ज्ञानप्रकाश, ता. १४।१०।३२

'केसरी'कार म्हणतातः—

वैद्यकीय व्यवसाय आणि ललितकलेची उपासना यांचा मेळ दुर्मिळ म्हणून कौतुकावह वाटतो आणि त्यांतहि एकाच घराण्यामध्यें हा मेळ दृष्टीस पडला म्हणजे कोणालाहि आनंदच वाटतो. प्रस्तुत पुस्तक हें वाचकांना असाच विस्मयपूर्वक आनंद देणारें आहे. डॉ. शंकरराव, त्यांचे बंधु, मावसबंधु व तीन बहिणी या सर्व कौटुंबिक परिवारानें रचलेल्या वाङ्मयश्रीचे तेजस्वी खंड या पुस्तकात विखुरलेले आहेत. त्यांपैकीं गद्यविभाग सुमारें शंभर पानांचा असून त्याचें जनकत्व कै. शंकरराव यांजकडे आहे. अलेक्झांड्रिया येथें असतां यांनीं आपल्या बहिणीस संसारमार्गदर्शक अशीं जीं पत्रें पाठविलीं तीं या गद्यविभागाचा गाभा होत. त्यांतील विचार इतर स्त्रियांनाहि उपयुक्त असून त्याची भाषा सहजसुंदर अशी आहे. काव्यभागावर पौराणिक कवींचे व विशेषतः वामनपंडितांचे किरण चमकत असलेले दिसतात. 'संशयमणिमाला' वगैरे अनुकरणाचे प्रकार बऱ्याच अंशीं सिद्धीला गेलेले आहेत. श्रीकृष्णावरील गाणीं, शब्दसौष्ठव व वृत्तमाधुर्य यांमुळें, स्त्रीवर्गांत प्रसार पावण्यासारखीं आहेत. शेवटीं दिलेलीं संस्कृत पत्रें व श्लोक हींहि लेखकांचा व्यासंग दर्शविणारीं आहेत. साहित्य-कुटुंबाचें लेखन असें मराठी वाङ्मयांत भिडेप्रभृति थोड्याच ग्रंथकारांचें एकत्र प्रकाशित झालेलें आहे, त्या प्रकाराच्या पक्वान्नांत या श्रीखंडानें मधुर अशी भर घातली आहे.

—केसरी, ता. २०।१।३३

'मुमुक्षु'कार ह. भ. प. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए. या विद्वद्रत्नाचा अभिप्रायः—

हा ग्रंथ नवीन प्रकारचा पण मौजेचा आहे, वाचनीय व संग्राह्य आहे. कै. डॉ. शंकर चिंतामण श्रीखंडे व त्याच्या बंधुभगिनी यांचे निवडक लेख व कविता यांचा यांत संग्रह आहे. ग्रंथाच्या नांवांतही काव्य आहे. डॉ. रामभाऊ श्रीखंडे यांनीं परिश्रमपूर्वक हा संपादिला आहे. एका घराण्यांतील सुशिक्षित स्त्रीपुरुषाचें परस्परप्रेम, विद्येच्या शुभसंस्कारांचें व उदात्त विचारांचें वातावरण यांच्या परिमळानें ग्रंथ भर-लेला असल्यामुळें त्याला विलक्षण गोडी आलेली आहे. आह्मांला हा ग्रंथ फार आवडला, व अशा प्रेमळ व सुविद्य घरांतील स्त्रीपुरुषांच्या मेळयांत एक दिवस आनंदानें काढावा अशीही स्वसुखस्वार्थाची ऊर्मी मनांत उत्पन्न झाली असें मोकळेपणानें लिहावेंसें वाटतें ! ह्या ग्रंथांत शंकरराव व त्यांचे बंधु डॉ. रामभाऊ, त्यांच्या तीन भगिनी, एक पुतणी व एक मावसभाऊ अशा सात परस्परप्रेमानें भारलेल्या सुविद्य जीवाचें घरगुती स्वरूपाचें गद्यपद्य वाङ्मय समाविष्ट झालें आहे. तें लिहिलें गेलें तेव्हां छापण्याची कल्पनाही नव्हती, यामुळें त्यास सहजपणाची माधुरी आली आहे. यांतील गद्यभाग ११५ पृष्ठांचा आहे व तो सर्व शंकररावांनीं आपल्या सौ. कृष्णाताई नामक बहिणीस अलेक्झांड्रियाहून पाठविलेल्या सतरा पत्रांनीं व्यापलेला आहे. पत्रें मनोरंजक व बोधप्रद आहेत. कवितां-पैकीं बारा कविता शंकररावांच्या आहेत, व रामभाऊ यांच्या २० कविता आहेत. गद्यपद्य लिखणांत सभ्य व रम्य विनोदाच्या छटा असल्यामुळें वाचन मनोरंजक होतें. शंकररावासारखा तरुण, कर्तबगार, प्रेमळ व विद्याप्रेमी मनुष्य अकालीं कालवश झाला यामुळें ग्रंथास शोकपर्यवसा-यित्वाचें रूप आलें आहे, पण श्रीखंडे मंडळींच्या शोकाचा भागीदार वाचकही होतो. ग्रंथाचे संपादक डॉ. रामचंद्र चिंतामण श्रीखंडे, कोल्हापूर, हें असून ग्रंथाची किंमत रु. २ अल्प आहे. श्रीखंडे बंधूंचे मावसबंधु विश्वनाथशास्त्री कात्रे यांचा पुढील विनोदी श्लोक ज्या ज्या घरांत बाळंतिणीच्या बाळा आहेत तेथें तेथें तरुण तरुणांच्याही सहज

तोंडीं येऊन घरभर मौजेचा आनंद पसरविणारा आहे ! :—

हाताखालिं सुईण ! तें रगडणें अंगास तें लावणें !
तें न्हाणें ! किति शेकणें ! सतत तें बाजेवरी लोळणें ! ।
डिंकाचे किति लाडु फस्त करणें ! तें तूप ! तें खोबरें !
सारा पाहुनि थाट वाटत मना — 'बाळंत होणें बरें !!' ॥

ह्या ग्रंथांतील सर्वच कविता उच्च दर्जाच्या व संसारसुखचित्र वठविणाऱ्या असून विनोदरसपूर्ण आहेत. —मुमुक्षु, जानेवारी १९३३

'महाराष्ट्र'कार ह्मणतात:—

अनेकविध पत्रपुष्पें वाहून शारदेची सेवा करण्याचा मान पुष्कळ साहित्यभक्तांनीं मिळविलेला असेल. पण अशा प्रकारच्या वाङ्मय-श्री-खण्डाचा तिला नैवेद्य दाखवून संतुष्ट करण्याचा अग्रमान कोल्हापूरचे डॉ. रा. चिं. श्रीखंडे यानीं संपादन केला आहे, यांत संशय नाहीं. श्रीखंडे घराण्यांतील पांच सात लेखक-लेखिकांचे लेख व कविता या ग्रंथांत संग्रहित केलेल्या असून, कै. डॉ. शंकरराव श्रीखंडे यांच्या स्मृति-निमित्त तो प्रसिद्ध करण्यांत आला आहे. डॉ. शंकरराव हे धंद्यानें जरी डॉक्टर असले, तरी बालवयांतील व विद्यार्थिदशेंतील शिक्षणाचे परिणाम त्यांच्या कोमल मनावर इतके दृढ झाले होते कीं, वाङ्मया-पासून ते स्वत: कधींहि अलिप्त राहू शकले नाहींत. मराठी ही मातृ-भाषा असल्यामुळें आणि लहानपणापासूनच वेद व उपनिषदें यांच्या अध्ययनांत काळ गेल्यामुळें, कोणतेही मनोविकार, मराठींत काय किंवा संस्कृतात काय व्यक्त करणें त्यांना सोपें जाई आणि, त्याचें मन इतकें काव्यसुलभ होतें कीं, कोणत्याही वस्तूंत त्यांना काव्यबीज प्रतीत होत असे. 'साध्याही विषयांत आशय कधीं मोठा किती आढळे,' हे केशव-सुतांचे उद्गार डॉ. शंकरराव यांच्या, किंबहुना या पुस्तकातील इतरांहि कवींच्या कवितांना यथार्थतेनें लागू पडतील. 'विवाहमंगल', 'निसर्गांतील प्रणयलीला', 'आद्यप्रसव व कुमारसंभव' इत्यादि कविता प्रस्तुत विधानाच्या निदर्शक ह्मणून दाखवितां येतील. डॉ. शंकरराव यांची कवितेविषयीं पुढील कल्पना होती—

काव्यं व्यथाजाड्यमलापहारि हृद्यं मनश्चेतननंदकारि ।

आणि ह्मणून महायुद्धांत अलेक्झांड्रिया येथें जावें लागलें असतांना, कामा च्या ऐन गर्दीतसुद्धां, कवितेला ते विसरूं शकले नाहींत. अलेक्झांड्र्याहून आपल्या बंधूंना त्यांनीं जीं पत्रें पाठविलीं आहेत, त्यावरून डाक्टर साहेब हे मार्मिक वाचक, उत्कृष्ट निरीक्षक व विनोदी गृहस्थ असावेत असें दिसतें. घराण्यांतील एक मनुष्य कर्तबगार निघाला, ह्मणजे त्याचे गुण कुटुंबातील अनेक माणसे कशीं उचलतात, हें प्रस्तुत पुस्तकांतील डॉ. रा. चिं. श्रीखंडे, सौ. गंगाबाई श्रीखंडे प्रभृति कवि-कवयित्रींच्या कवितांवरून कळून येतें. अशा प्रकारचा नमुनेदार कौटुंबिक ग्रंथ प्रसिद्ध करण्याची नवी प्रथा पाडल्याबद्दल डॉ. रा. चिं. श्रीखंडे यांचें आह्मी अभिनंदन करितों. —महाराष्ट्र, ता. २७।११।३२

श्री. ग. श्री. हुपरीकर, एम्. ए. ( कवि-विरागी ) ह्मणतात:— "एकंदरींत साकल्यानें पाहिल्यास 'वाङ्मय-श्री-खण्ड' हा महाराष्ट्रसारस्वतांतील एक वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथ आहे."

प्रो. वा. वि. मिराशी, एम्. ए., संस्कृतविभागाविषयीं लिहितात:— "संस्कृत भाषेवरच्या निस्सीम प्रेमामुळें उभयतां बंधूंनीं केलेली काव्यनिष्पत्ति पाहून आश्चर्य व कौतुक वाटतें.... "

श्रीमंत सर बाळासाहेब पंतप्रतिनिधि, बी. ए., औंधचे अधिपति लिहितात:— "या वाङ्मय-श्री-खण्डाची गोडी एकदा जिभेला उमगल्यावर त्यापासून होणारा आनंद हा प्रत्यक्ष श्रीखंडसेवनापासून होणाऱ्या आनंदापेक्षां कितीतरी उदात्त आणि चिरंजीव आहे........पुस्तकांतील दोषांचे मानानें गुणांचें पारडें फारच जड भरतें..."

'यशवंत' अंक ४९ मध्यें प्रसिद्ध टीकाकार श्री. वि. स. खांडेकर ग्रंथपरीक्षण करतांना लिहितात:— "पण वाङ्मय-श्री-खण्ड केवळ विनोदपर नाहीं. विनोदाचें दहीं, मराठी काव्याची साखर व संस्कृत काव्याचें केशर यांचा संगम या श्रीखंडांत झाला असून दह्यांत मधूनमधून आढळणारा चक्का व साखरेचा देशीपणा यांच्यामुळें त्याला एक प्रकारची लज्जत आली आहे........ डॉ. रा. चिं. श्रीखंडे यांच्या 'मुकुंदपूजा', 'निसर्गांतील प्रणयलीला,' 'भारतास प्रणाम' इत्यादि कवितांत आढळणारा चमत्कृतिजनक कल्पनाविलास हा स्वतःच एक चमत्कार नव्हे काय? श्री. विश्वनाथशास्त्री कात्रे इंग्रजी शिकले नसूनही 'शरत्काल' अगर 'यमुनातीरीं' अशीं आधुनिक पद्धतीचीं काव्यें लिहितात. संस्कृत पद्यविभाग ह्मणजे तर या चमत्कृतिमंदिराचा कळसच !..."